# हिंमते मर्दा (अण्णा बोराटे जीवनसंघर्षकथा)

लेखक : उल्हास हरी जोशी

joshiulhas5@gmail.com



ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com



प्रकाशन : २८ फ़ेब्रुवारी २०१५

<u>मूळ पुस्तक :</u>

<u>गरीब शेतकरी</u>

<u>ते यशस्वी उद्योजक</u>

सदाशीव रामा बोराटे

उर्फ

अण्णा

शब्दांकन : -

उल्हास हरी जोशी

## प्रस्तावनाः-

मराठी समाज अजूनही उद्योग व्यवसायाच्या क्षेत्रात बराच मागे आहे. अजूनही हा समाज नोकरीच्या मानसिकतेमधेच अडकला आहे. उत्तम शिक्षण हे उत्तम नोकरी मिळविण्यासाठीच घ्यायचे असते हा पक्का समज मराठी समाजात आहे. उत्तम शिक्षण घेऊन उत्तम नोकरी मिळवावी. शक्य झाल्यास ती नोकरी आयुष्यभर सांभाळून ठेवावी. आपले सारे कौशल्य, कष्ट, मेहेनत त्या नोकरीतील प्रगतीसाठी, इन्क्रिमेन्ट्स व प्रमोशनसाठी खर्च करावी. साठीच्या आसपास निवृत्त व्हावे. निवृत्तीनंतरचे आयुष्य आरामात, म्हणजे काहिही न करता घालवावे अशी सर्वसाधारण मराठी माणसाची मनोवृत्ती असते. अर्थात यात चुकीचे किंवा वावगे काही नसले तरी याच मनोवृत्तीमुळेच मराठी माणसाला सुरक्षित आयुष्याची सवय लागली आहे. त्याचा अशा प्रकारच्या सुरक्षित आयुष्याकडे जास्त ओढा आहे. पण या मनोवृत्तीमुळेच मराठी समाज उद्योग व्यवसायाच्या क्षेत्रात मागे पडला आहे. उद्योग व्यवसायाच्या दृष्टीने महाराष्ट्र राज्य हे भारताची अमेरिका आहे असे म्हटले तर ती अतिशयोक्ती ठरु नये. पण याच मराठी राज्यात मराठी लोकांची अवस्था अमेरिकेतील रेड इन्डीयन्स सारखी झाली आहे. याला मराठी लोकच जबाबदार आहेत.

असे असूनही काही मराठी लोकांनी उद्योग व्यवसायात येण्याचे धाडस केले आहे. अत्यंत प्रतिकुल परिस्थितीमधेसुद्धा या लोकांनी त्यांचे उद्योग व्यवसाय यशस्वी करून दाखवले आहेत. अशा लोकांची संख्या जरी थोडीशीच असली तरी त्यांचे योगदान कमी महत्वाचे नाही.

टाटा, बिर्ला, किर्लोस्कर, अंबानी यासारख्या मोठ्या उद्योगपतींची चरित्रे प्रसिद्ध झाली आहेत. त्यांच्या यशोगाथा किंवा सक्सेस स्टोरीज सर्वांनाच ठाउक आहेत. अर्थात उद्योग व्यवसायातील त्यांवे कर्तृत्व, त्यांचे योगदान हिमालयाएवढे मोठे आहे यात काही वादच नही.

पण अण्णांसारखे अनेक छोटे उद्योजक आहेत. त्यांनी पण अत्यंत प्रातिकुल परिस्थितीत, अनेक संकटांशी व समस्यांशी सामना करत, प्रचंड मेहेनत करून आपले उद्योग व्यवसाय यशस्वी करून दाखवले आहेत. त्यांच्या यशोगाथा उर्फ सक्सेस स्टोरीज अजूनपर्यंत

लोकांपर्यंत पोचलेल्या नाहीत. त्या पण अत्यंत स्फुर्तीदायक अशाच आहेत. त्यांच्याकडून बरेच काही शिकता येण्यासारखे आहे.

अण्णांची यशोगाथा आपल्यापर्यंत पोचविण्याची संधी मला अण्णांनी दिली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. आपल्यालाही त्यांची यशोगाथा स्फुर्तीदायक वाटेल. तसेच उद्योग व्यवसायाविषयी आपल्या मनातील नकारात्मक विचारांची जागा सकारात्मक विचार घेतील अशी आशा आहे.

अण्णांकडून स्फुर्ती घेऊन जास्तीत जास्त मराठी तरुणांनी/ तरुणींनी उद्योग व्यवसायात यावे हीच शुभेच्छा!

# निवेदकाचे दोन शब्द ____________ उल्हास हरी जोशी



माझा आणि अण्णांचा परीचय तसा अलिकडचाच. यशस्वी मराठी उद्योजकांना शोधुन काढून, त्यांच्या यशोगाथा मराठी समाजापुढे आणून त्यांच्यात उद्योग व्यवसायाची मानसिकता निर्माण करावी हा मुळ उद्देश. प्रथम कांही मराठी महिला उद्योजिकांच्या मुलाखती घेऊन त्यांच्या यशोगाथा लोकांपुढे आणण्याच्या माझ्या प्रयत्नांना यश मिळाले ते सांगलीचे ए. आय. मुजावर यांच्यामुळे. मुळात मी लेखक नाही किंवा चांगला लेखक होण्याचे गुण माझ्यात फारसे नसावेत असा माझा समज होता. एक छंद म्हणून लेखनाला सुरवात केली व हे लेख छापून यावेत म्हणून प्रयत्न पण करून पाहिले. अर्थातच जे इतर मराठी नवलेखकांचे होते तेच माझे पण झाले. मराठी प्रकाशकांनी माझ्या लेखांना केराची टोपली दाखवली व माझ्यातील हुरुप मारून टाकला. त्यामुळे मी लेखक होऊ शकत नाही असे मला ठामपणे वाटु लागले.

पण यात एक आश्चर्यकारक गोष्ट घडली. मी मार्केटींग या विषयावर इंग्रजीमधे लेखन केले होते ते अमेरिकेतील ऑथरहाऊस नावाच्या प्रकाशकास पसंत पडले. माझे पहिले पुस्तक ‘ Marketing for everybody’ हे अमेरिकेत प्रकाशित झाले व माझ्यात लेखक म्हणून पुन्हा उत्साह संचारला. सांगलीच्या मुजावरांनी त्यांच्या आम्ही उद्योजिका या मासिकात माझे लेख प्रसिद्ध करून मला प्रोत्साहीत केले. पुण्याच्या सकाळ या लोकप्रिय दैनिकाचे संपादक मुकुंद लेले व चंद्रशेखर पटवर्धन यांनी माझे लेख सकाळमधे प्रसिद्ध करून माझा उत्साह आणखी वाढवला. पुण्याहून प्रसिद्ध होणाऱ्या ब्राम्हण व्यावसायिक पत्रिका या मासिकाच्या कार्यकारी संपादिका सौ. जयश्री धुपकर यांनी माझे लेख नियमितपणे प्रसिद्ध करून माझा हुरुप अणखी वाढवला. मला लिहिता येते व ते वाचकाला आवडु शकते याची जाणीव मला झाली.

मी पहिल्यांदा अण्णांची मुलाखत घ्यायला गेलो. तेव्हाच कदाचित त्यांनी माझ्यात लेखकाचे काही गूण असावेत हे ओळखले असावे. खरे तर अण्णांचे आत्मचित्र मागेच प्रसिद्ध झाले आहे. मी फक्त त्याच्यात थोडा बदल करून ते कथारुपात किंवा Story Form मधे आणायचा प्रयत्न केला आहे. कारण आत्मचरित्रात जो ‘ मी ‘ पणा असतो तो टळावा म्हणून. तसेच कथा रुपात सांगितलेले चरित्र वाचकांना जास्त भावते असे मला आढळून आले आहे. माझा हा प्रयत्न आपणास पसंत पडेल असे वाटते.

## अण्णाचे दोन शब्दः-

27 जानेवारी 1997 रोजी मी अण्णा, उर्फ सदाशीव बोराटे, या माझ्या आत्मकथनाचे प्रकाशन उद्योग पर्वाचे जनक, महाराष्ट्र भूषण माननीय बी. जी. शिर्के यांचे शुभहस्ते पुण्याच्या मराठा चेम्बर्सच्या सभागृहात झाले. यानिमीत्त थोर विचारवंत डॉ. मा. पं. मंगुडकर, जेष्ठ कवी कै. वसंत बापट, सुप्रसिद्ध साहित्यिक आनंद यादव, डॉ. कुमार सप्तर्षी, दै. लोकसत्तेचे उपसंपादक कै. नरेंद्र बोडके असे अनेक मान्यवर या कार्यक्रमास उपस्थित होते. मी मुळात लेखक नाही. तसेच ग्रामीण भागातून आल्यामुळे शब्दभांडार पण तोकडेच. त्यातून सतत उद्योगांत व्यस्त असल्यामुळे मला इतर विचार करायला सवड मिळाली नाही. आपल्या मराठी भाषेत एकापेक्षा एक थोर लेखकांची परंपराच आहे. अशा वेळी माझ्यासारख्या माणसाने जर काही लेखन केले तर ते कोण वाचणार? परंतु कै. नरेंद्र घोडके यांनी मला प्रोत्साहन दिले. आधी माझ्या आत्मकथनाचे पुस्तक लिहावे हे माझ्या मनातसुद्धा नव्हते. परंतु कै. नरेंद्र घोडके यांच्या प्रेमळ आग्रहामुळे मी पुस्तक लिहिण्याचे धाडस केले.

पुस्तक लिहिण्याचा मुळ उद्देश अर्थाजन नसून माझे एक उद्योजक म्हणून आलेले अनुभव व माझे विचार लोकांपुढे यावेत. व त्यातून उद्योग व्यवसायांत येऊ इच्छीणाऱ्या मराठी तरुणांना प्रोत्साहन मिळावे हा होता. यामुळे मी या पुस्तकाच्या मर्यादित प्रती काढून त्याचे अनेक शाळा, कॉलेजमधील ग्रंथालयामधे मोफत वाटप केले. माझा हा उपक्रम अनेकांना पसंत पडला व मला अनेक प्रोत्साहित करणारे अभिप्राय तर मिळालेच. पण मला अनेकजण प्रेमाने भेटायला आले, अगदी परगावहूनसुद्धा आले. त्यामुळे ज्येष्ठ कवी कै. गंगाधर महांबरे, पत्रकार मंगेश कश्यप, तसेच विविध क्षेत्रातील थोर, विद्वान व दिग्गज मंडळींशी परीचय झाला.

अनेकांनी मला “पुस्तकाचे पुनर्लेखन करावे, यामधे माझा सुरवातीचा संघर्षाचा काळ व नंतरचा प्रगतीचा काळ याविषयावर सविस्तर लिहावे” अशी सुचना केली.

माझा सांगलीच्या श्री. ए. आय. मुजावर यांच्याशी परीचय झाला. उद्योग क्षेत्रातील मराठी माणसांसाठी व विशेषतः मराठी महिलांसाठी ते करीत असलेल्या कार्यामुळे मी प्रभावीत झालो. त्यांनी माझा सांगलीच्या केशवराव भोसले नाट्य मंदिरांत सत्कार केला होता. त्यावेळी माझी श्री. उल्हास जोशी यांच्याशी ओळख झाली. त्या ओळखीचे रुपांतर पुढे मैत्रीत झाले. त्यांनी माझ्यावर लिहिलेला लेख सकाळ या लोकप्रिय दैनिकांत प्रसिद्ध झाला. पण ते एवढ्यावर थांबले नाहीत. त्यांनी माझ्यावर पुस्तक लिहिण्याची इच्छा व्यक्त केली. आधी मी

फारसा उत्सुक नव्हतो. पण मग घरच्यांचा सल्ला घेऊन त्यांच्या इच्छेला मान देण्याचे मान्य केले. मी प्रसिद्ध केलेले आत्मचरित्र त्यांना दाखवले. त्यांनी माझ्या पुस्तकाचे पुनर्लेखन करून ते पुस्तक अधिक वाचनीय करण्याची मान्य केले.

मला अजूनही असे वाटते की माझ्यावर कोणीतरी पुस्तक लिहावे एवढे आपण मोठे नाही. समाजामधे प्रत्येक व्यक्तिला स्वतःचे चरित्र हे असतेच. कित्येक जण आपापल्या क्षेत्रांत उत्तम प्रकारे काम करीत असतात व समाजाला प्रेरणा देत असतात. अशा लोकांच्या यशोगाथा समाजापुढे यायला पाहिजेत. परंतु श्री. उल्हास जोशी यांच्या मते माझी चरित्रकथा लोकांसमोर यायला हवी. कारण मी वेगळ्या प्रकारचे जीवन अनुभवले आहे. अनंत अडचणीतून मार्ग काढून कारखानदारीत शिरलो. दारिद्रयाची तमा न बाळगता पुण्याला आलो. कल्पना करा अशिक्षीत आई वडिलांचा, अल्पभुधारक शेतकरी कुटुंबातील एक मुलगा गणित घेऊन एम.एस्सी. होणे ही किती कठीण गोष्ट होती. खिशांत दीडकी नसतांना कारखानदार होण्याचे स्वप्न बघायचे धाडस केले. पुण्यामधे मला माझे स्वप्न साकारण्याचा वाव मिळाला. हे सगळे कसे घडले हे समाजाला समजले पाहिजे. मोठ्या उद्योजकांची चरित्रे नेहमीच प्रसिद्ध होत असतात व प्रेरणा देत असतात. हा वरचा वर्ग झाला. पण त्यांना मोठ्या प्रामाणावर लागणारा माल दुसऱ्या फळीतील उद्योजक बनवतो. त्याचीसुद्धा एक चरित्रगोष्ट असते. हा दुसऱ्या फळीतील उद्योजक पुढे जाऊन मोठा उद्योजक होऊ शकतो किंवा त्याची पुढली पिढी त्याचे स्वप्न पुर्ण करु शकते. याच विचारांनी मी माझ्या चरित्राच्या पुनर्लेखनासाठी संमती दिली.

सदाशीव रामा बोराटे

# हिंमते मर्दा

## एक

अण्णांचे संपुर्ण नांव सदाशीव रामा बोराटे. जन्म 27 जानेवारी 1946 चा. जन्मगांव तडवळे हे एक छोटे खेडेगांव. हे गांव तालुका कोरेगांव जिल्हा सातारा मधे येते. साताऱ्याहून अंतर 20 किलोमीटर तर कोरेगावपासून 5 किलोमीटर. हे गांव वांगना नदीकाठी वसले आहे. कोरेगांव हे जवळचे मोठे गांव वा तालुक्याचे ठिकाण.

या गांवातील मुख्य वस्ती शेतकरी लोकांची. शेती हा मुख्य व्यवसाय. बहुतेक शेतकरी अल्पभुधारक. तसेच बहुतेक जणांची शेती पाऊसावर अवलंबुन. त्यामुळे बहुतेक कुटुंबांची आर्थिक परिस्थिती बेताचीच. अशाच बोराटे कुटुंबात अण्णाचा जन्म झाला. या शेतकऱ्यांच्या वाट्याला ज्या हाल-अपेष्टा, कष्ट, हलाकिची अस्थीर परिस्थिती येते ती बोराटे कुटुंबियांच्या पण वाटेला आली होती. पण अजूनही अण्णांना त्यांचे लहानपणचे गांव, तेथील भरपुर स्वच्छ हवा, मोठी मोकळी जागा, गावाच्या आजुबाजुला असलेली गर्द हिरवीगार झाडी, संध्याकाळी येणारी गार वाऱ्याची झुळुक या गोष्टी आठवतात.

अण्णांचे घर म्हणजे साधी झोपडीच. अण्णांचा जन्म झाला तेव्हा गावात प्लेगची मोठी साथ आली होती. त्यामुळे सर्व गावकरी शेतावर रहायला गेले होते. अण्णांचे कुटुंब पण शेतावर रहायला गेले होते. त्यामुळे अण्णाचा जन्म शेतावर आंब्याच्या झाडाखाली झाला व तोसुद्धा रात्रीच्या प्रहरी कधीतरी. त्यावेळी गावांत विजेची सोय नव्हती. शेतावर तर कसलीच

सोय नव्हती. बाळंतपण शेजारच्या बाईने केले. थोड्क्यात जन्मापासूनच प्रतिकुल परिस्थितिशी झगडणे अण्णाच्या नशिबी आले.

अण्णांच्या वडिलांचे नांव रामा बाबू बोराटे. गंमत म्हणजे तडवळे हे त्यांचे मुळ गांव नव्हते. त्यांचे मुळ गांव बिदाल तालुका माण जिल्हा सातारा. पण ते घरजावई झाले व तडवळेला आले. अण्णांचा त्यांच्या वडिलांच्या मुळ गावाशी फारसा संबंध आला नाही.

अण्णा चार मुलांपैकी चवथ्या नंबरचे चिरंजीव. शेंडेफळ असल्यामुळे थोडेसे लाडके. पण थोडेसेच, फार नाही. कारण घरी अठरा विश्वे दारिद्र्य असताना मुलांचे नसते लाड करणे परवडणारेच नव्हते. पिठाची गिरणीसुद्धा लांब म्हणजे कोरेगावला होती. त्यामुळे घरी जात्यावर पीठ दळणे आवश्यक असायचे. अण्णांची आई हे काम जवळजवळ रोज तासंतास करायची. पहाटे चार वाजता उठून जात्यावर दळण दळायचा कार्यक्रम सुरु व्हायचा. अण्णाची झोप बहुतेकवेळा या जात्याच्या घरघर आवाजाने मोडायची. पण त्यांच्या आईकडे एक कला होती. ती म्हणजे लोकगीते गाण्याची. त्यांच्या आईकडे लोकगीतांचा प्रचंड संग्रह होता. आता अण्णांना वाटते की त्यांच्या आईचा हा लोकगीतांचा खजिना लिहून ठेऊन जपून ठेवायला हवा होता. दोन दोन तास त्यांची आई मुलांसाठी लोकगीते म्हणत असायची.

अण्णाचा जन्म झाला आहे माळी समाजात. हा समाज पुर्वीपासून शेती करत आला आहे. महात्मा ज्योतिबा फुले हे पण माळी समाजातलेच. जरी त्यांनी शिक्षणाची परंपरा सुरु केली असली तरी एकूण माळी समाज हा शिक्षणापासून दूरच. शेतीशिवाय दुसरा कोठला व्यवसाय माहीत नाही. तडवळे गावाची मुख्य वस्ती मराठा समाजाची. तेथे झांजुर्णे आडनावांची माणसे जास्त. त्यामुळे त्यांचे गाव झाजुर्ण्यांचे तडवळे म्हणूनसुद्धा प्रसिद्ध होते. त्याशिवाय शिर्के, साळुंखे या आडनावाची पण बरीच माणसे आहेत. अण्णांचा जन्म झाला तेव्हा गावात मराठा समाजाची घरे जास्त होती. बौध्ध समाजाची विसएक, मांगाचं एक तर चांभाराची चार, नाभीक समाजाची चार, मुस्लीम समाजाची पंचवीस तर माळी समाजाची पंचवीस घरे होती. थोडक्यात तडवडळे गावात पहिल्यापासूनच अनेक वेगवेगळया जाती जमातीचे व समाजाचे लोक गुण्यागोविंदाने एकत्र रहाताना दिसत आहेत.

अण्णांचे वडील मिलिटरीत होते. पण अण्णांचा जन्म झाला तेव्हा ते रिटायर होऊन परत आले होते. त्यावेळी त्यांना महिना 7 रुपये पेन्शन मिळत असे. घरी दहा एकरांचे शेत होते. ते त्यांच्या वडिलांचे नव्हते तर आईचे होते. कारण वडील घरजावई म्हणून आले होते. शेतात भरपुर काम करावे, भरघोस उत्पन्न काढावे, उसाच्या- ज्वारी, कांदा यांच्या बागा फुलवाव्यात, चांगले अर्थाजन करावे या विचाराचे ते होते. पण ते नेहमी जमतेच असे नव्हे. संध्याकाळी सर्व भाऊ, आई व वडील घरात एकत्र असल्यावर जागेअभावी बसण्याची अडचण होत असे. पुर्वी घरात तेलाची पणती किंवा रॉकेलचा कंदील मिणमीणत असे. वडिलांची घरामधे फारच शिस्त होती. रात्री आठच्या अगोदर सर्वांना घरात यावे लागे. शिस्त मोडल्याबद्दल अण्णाने वडिलांचा मार खाल्ला आहे. प्लेगची साथ ओसरल्यानंतर 1951 साली अण्णाचे कुटुंब गांवात रहायला आले ते पत्रे असलेल्या झोपडीत. ते घर आतबाहेर असे होते. बाहेर जनावरांचा गोठा होता. तेथे बांधलेल्या गाई म्हशींच्या मलमुत्राचा वास अगदी घरातील चुलीपर्यंत येत असे. आत एका बाजूला चुल होती. त्याच्या शेजारी शिंकी बांधलेली होती. त्यावर एकावर एक अशी मातीची मडकी ठेवलेली असायची. त्या मडक्यात आई कधी दही तर कधी लोणी ठेवत असे.

गरिबी म्हणजे काय असते याचा अनुभव अण्णाने लहानपणापासूनच घेतलेला आहे. गरिबांची होणारी पिळवणूक त्याने लहानपणापासूनच अनुभवली आहे. गावातील गुंडगिरीचा अनुभव घेतला आहे. गावातून जाताना नमस्कार केला नाही म्हणून त्यांच्या बंधुंनी मार खाल्ला आहे. त्यांच्या शेतातून कित्येकवेळा बळजबरीने पिके काढून नेली आहेत. उभ्या पिकात जनावरे सोडली आहेत. पण एवढे असूनही अण्णांना अजूनही त्यांचे गाव प्यारे आहे. कारण याच गावात त्यांना काही उत्तम मित्र मिळाले. उत्तम कांबळे हा उत्तम पोवडे म्हणायचा. शाहिरी थाटातील त्याचा आवज ऐकला की सगळे मित्र पहातच रहायचे. आनंदराव कांबळे म्हणून दुसरे एक गृहस्थ होते. त्यांना मुरली वाजवण्याचा फारच नाद होता. ते सकाळ संध्याकाळ दोन- दोन तास नदिकाठी बसून मुरली वाजवायचे. त्यांच्या मुरलिचा आवाज ऐकण्यासाठी गावातील मुले तासंतास त्यांच्याजवळ बसत असत. अण्णाला त्यातले काही

कळायचे नाही पण त्यांच्या मुरलिच्या आवाजात विलक्षण गोडवा होता एवढे अण्णाला आठवते.

अण्णाच्या गावांत पुर्वी जाती-पातीला फार महत्व दिले जायचे. गांवाबाहेर बौद्ध वाडा असायचा. त्याला पुर्वी महारवाडा असे संबोधले जायचे. उत्तम कांबळे हा जरी अण्णाचा मित्र होता तरी तो वर्गामधे लांबच बसायचा. शाळेत सर्व विद्यार्थी पोत्याच्या बस्करावर बसत असत. पण उत्तम कांबळे मात्र बस्कराशीवाय बसायचा. वर्गात सुवर्ण व दलित समाजाची मुले होती. ती शक्यतो एकमेकांना शीवत नसत. अण्णाला याविषयी कांही समजत नव्हते पण त्याला काहीतरी वेगळे वाटायचे. शिक्षकांचासुद्धा याला पाठींबा असावा असे वाटायचे. पण कां कुणासठाऊक, अण्णाला पहिल्यापासूनच दलित समाजाबद्दल एकप्रकारचा जिव्हाळा वाटू लागला. दलित समाजाची बरीच जमीन होती. तसेच त्यांची एक देवी पण होती. ती देवी त्यांचे दैवत होती. ही मंडळी पुर्वी गावांत जर काही कार्यक्रम असेल तर त्याची माहिती देण्यासाठी हलगी वाजवत व लांब उभे राहून गांवकऱ्यांना माहिती द्यायचे. याला दवंडी देणे असे समजले जायचे. गांवात जर जनावरे मेली तर त्यांना गांवाबाहेर नेण्याचे काम यांना करावे लागायचे. अशाच पद्धतीचा बारा बलुतेदार हा प्रकार पुर्वी खेडेगांवामधे आस्तित्वात होता. माळी, सुतार, लोहार, महार, मांग, चांभार, कोळी, शिंपी, तेली, न्हावी, परीट, गुरव हे ते बारा बलुतेदार असायचे. प्रत्येकाचे वेगवेगळे काम ठरलेले असायचे. गावातील लोकांना लागणाऱ्या प्रमुख सेवा- सुविधा पुरविण्याचे काम हे लोक करीत असत. एका अर्थाने ही एक 'सर्व्हीस इंडस्ट्रीच' होती. आता गावातील परिस्थिती पुर्वीसारखी राहिलेली नाही. आता गावात सुशिक्षीत लोकांची संख्या वाढत असून आता गुंड प्रवृत्तीला बऱ्यापैकी आळा बसला आहे. आता जाती पाती फारशा पाळल्या जात नाहीत. पण काळाच्या ओघात बारा बलुतेदार ही सिस्टीम बंद झाली.

सर्जेराव झांजुर्णे या व्यक्तीबद्दल अण्णाला अतीव आदर आहे. हे गृहस्थ एकदम धिप्पाड. शरीर कमावलेले. एकदम शांत वृत्तीचे. अण्णांच्या वडिलांच्या ओळखीमुळे पुण्याला बॉम्बे इंजिनीयरींग ग्रुपमधे- मिलीटरी मधे नोकरीला लागले. तेथे ते सुतारकाम, गवंडीकाम, पुल बांधणे अशी अनेक कौशल्य शिकले. पण इतका शांत असलेला मनुष्य असूनसुद्धा

त्यांच्याकडून गुन्हा घडला असे म्हणतात. त्यामुळे त्यांच्यावर कोर्टात खटला चालु होता. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे त्यांचे वकील होते. नंतर ते मिलिटरीतून बाहेर पडले व त्यांच्या जीवनात मोठा बदल घडला. 1952 साली तळवडे गावात ग्राम पंचायत स्थापन झाली. तेव्हापासून 40 वर्षे सर्जेराव सरपंच होते. त्यांनी गावाच्या सुधारणेसाठी अफाट मेहेनत घेतली. तसेच पुढे सरपंच बापु म्हणूनच प्रसिद्ध झाले. त्यांच्या घरात जवळ जवळ 40 ते 50 माणसे होती. पण बापुंनी आपले जीवन जणुकाही गावासाठी अर्पण केले होते. त्यांच्याकडे एक सायकल होती. ते गावाच्या कामासाठी सतत सायकलवर फिरत असत. 20 किलोमीटरवर असलेल्या सातारलाही सायकलवर गावाच्या कामासाठी दिवसातून दोन चकरा मारीत असत. कोरेगाव ते तडवळे असा पाच किलोमीटरचा कच्चा रस्ता होता. पावसाळ्यात तो बंद पडे किंवा हे अंतर कापायला दोन दोन तास लागत. बापूंनी हा रस्ता श्रमदानाने पक्का करून घेतला. तोसुद्धा स्वतःसाठी एक पैसुद्धा न घेता. घरचे अन्न खाऊन गावासाठी झटले. शाळा बांधायची होती ती जागा गांवाला लागून नव्हती. बापुंनी दलित समाजाची जागा त्यांना विश्वासात घेऊन शाळेसाठी मिळवली. दहा खोल्यांची शाळा बांधली. शाळेच्या उद्घाटणाला महाराष्ट्राचे त्या वेळचे शिक्षण मंत्री बाळासाहेब देसाई आले होते. याच कार्यक्रमात रंगराव कांबळे व जिजाबा कांबळे यांचा शाळेसाठी जमीन दिल्याबद्दल सत्कार करण्यात आला. गावात लाईट आणली, टेलिफोन आणले. गावात ज्ञानेश्वर माऊलींचे भव्य मंदीर बांधले. यासाठी देणग्या गोळा करण्यासाठी ठिकठिकाणी फिरले.

सर्जेराव, बापुंसारखी निस्पृहपणे काम करणारी माणसे अण्णांना याच गावात भेटली. सचोटी, प्रामाणिकपणा, निस्पृहपणाचे जे बीज अण्णाच्या मनांत कायमचे कोरले गेले ते या अशा लोकांमुळेच. अण्णाचे व सरपंच बापूंचे घरगुती संबंध फारच जवळचे होते. तसेच दोघांमधे वयाचे अंतर बरेच होते. अण्णाच्या पडक्या घरातसुद्धा येऊन भाजी भाकरीचा आस्वाद बापु घेत असत. गांवातील मंदीरात देव दर्शनाला गेले असता तेथेच मंदिरात हृदय बंद पडून देवा घरी गेले.

अण्णाला घरचे संस्कार उत्तम मिळाले. त्यांचे वडील जरी मिलिटरीमधे होते तरी पुर्णपणे निर्व्यसनी होते. ते गरीब होते पण विचारांनी श्रीमंत होते. त्यांनी मुलांना मटण, दारु,

चोरी यांसारख्या वाईट सवयींपासून कटाक्षाने दूर ठेवले. चहासुद्धा घरी कोणी पाहुणे आले तरच व्हायचा. खोटे बोलल्याबद्दल एकदा अण्णाने खुप मार खाल्ला. गावात तमाशा यायचा. त्याचा पंधरा दिवस मुक्काम असायचा. गावातील बहुतेकजण तो बघायला जात. पण तमाशा बघणे चांगले नव्हे. त्याने मुलांवर वाईट परीणाम होतात असे अण्णाच्या वडिलांना वाटायचे. असे असताना एकदा अण्णा वडिलांना चुकवून तमाशा बघायला गेला. हे वडिलांना कळल्यावर त्यांनी अण्णांचा भरपुर समाचार घेतला. त्यानंतर अण्णाने कधी तमाशा पाहिला नाही. आता अण्णाचे वय 66 आहे. पण अजूनही ते संपुर्णपणे निर्व्यसनी आहेत. अगदी सुपारिच्या खांडेचे पण व्यसन नाही. हे सगळे वडलांच्या संस्कारामुळे घडले. पुढील आयुष्यात अण्णावर अनेक संकटे आली, अनेक संघर्षाला तोंड द्यावे लागले. अनेक कठीण प्रसंग आले. पण अण्णाला ना कधी सिगरेटची आठवण आली ना दारुची. व्यसनांनी प्रश्न सुटत नसतात असे अण्णाचे मत आहे. अण्णाने जी संकटे अनुभवली याचा विचार केला तर त्याने स्वतःला दारुच्या पेल्यात बुडवून घ्यायला हवे होते. पण तसे घडले नाही. उगीचच कोणत्या ना कोणत्या छोट्या मोठ्या संकटाचे कारण पुढे करून व्यसनांच्या जाळयात स्वतःला अडकवून घेणाऱ्या हल्लिच्या तरुण पिढिला अण्णाकडून बरेच काही शिकता येण्यासारखे आहे.

अण्णांची आई अशिक्षीत होती. ती कधी शाळेत गेली नाही. पण ती शिक्षणाचें महत्व ओळखुन होती. शिक्षणानेच खरी प्रगती होऊ शकेल हे तिने पक्के ओळखले होते. त्यामुळे घरी गरिबी असूनही तिने आपल्या मुलांना शिक्षणासाठी नेहमीच प्रोत्साहन दिले. आपल्या मलांनी शिकून मोठे व्हावे व चांगली सरकारी नोकरी मिळवावी अशी तिची इच्छा होती. त्यासाठी वाटेल तो त्याग करायची तिची तयारी होती. त्याचा एक फायदा झाला. अण्णाची शिक्षणाची वाट मोकळी झाली. पण ही वाट सोपी नव्हती. तीसुद्धा काटाकुट्यांनी, खाचखळग्यांनी भरलेली होती.

## हिंमते मर्दा

## दोन

पुर्वी सात वर्षे पुर्ण झाल्याशिवाय शाळेत प्रवेश मिळत नव्हता. तसेच जन्मतारीख अंदाजे सांगितली जायची. अण्णाला सातवे वर्ष लागले आणि त्याच्या शिक्षणाला सुरवात झाली. अण्णाचे शिक्षण गावातील शाळेतच सुरु झाले. गावांत पहिली ते सातवीपर्यंत शाळा होती. पण ती शाळा म्हणजे एक दिव्यच होती. गावात एक मारुतिचे मंदीर आहे. त्या मंदिरात ही शाळा भरत असे. ते जुन्या बांधणीचे, पुर्णपणे लाकुड व दगडाचे मजबुत बांधकाम असलेले देऊळ आहे. अण्णाला आठवते त्याप्रमाणे पाचवीपर्यंतचे शिक्षण मारुतिच्या मुर्तीसमोर बसूनच झाले. त्यावेळी आत्ताच्या शाळांमधे असतो तसा बाके, बेन्चेस, टेबल, खुर्च्या, फळे असा थाटमाट नसायचा. जमिनीवर बसूनच अभ्यास करावा लागायचा. दोन तुकड्यांना मिळून एकच मास्तर असायचे. मारुती हे गावाचे ग्रामदैवत होते. तेथे एक भलीमोठी घंटा पण होती. दिवसभर मारुतिच्या दर्शनाला येणाऱ्या लोकांची ये जा असायची. हे लोक दर्शन घेताना सारखी घंटा बडवायचे. त्या घंटेच्या आवाजाने नेहमी लक्ष विचलीत होत असे. त्यामुळे अण्णाला लहानपणापासूनच अडथळयांच्या शर्यतिची सवय झाली होती.

अण्णाच्या कुटुंबात फारसे कोणी शिकलेले नव्हते. अण्णाचे वडील पाचवीपर्यंत शिकले होते. त्यामुळे अण्णाच्या घराण्यात तेच सर्वात जास्त शिकलेले होते. त्यावेळी पाचवीलासुद्धा मान होता. पाचवी पास झालेल्यांना पुर्वी मिलिटरीत किंवा पोलीस दलात प्रवेश मिळायचा. अण्णाचे दुसऱ्या नंबरचे थोरले बंधु यशवंत (त्यांना नाना म्हणायचे ) पहिल्यांदा सातवीची परिक्षा उत्तिर्ण झाले आणि त्यांच्या घराण्यात सर्वात जास्त शिकलेले झाले. पण त्यानंतर आठवीच्या पलीकडे कोणाची गाडी गेली नाही. त्यावेळी सातवीलासुद्धा महत्व होता. सातवीच्या परिक्षेला व्ह.फा. (व्हर्नाक्युअल फायनल) म्हणत असत. या लोकांना पण चांगल्या नोकऱ्या मिळत असत. मॅट्रीक म्हणजे 11 वी म्हणजे फार मोठे शिक्षण समजण्यात येई. आत्ताच्या शिक्षणाशी तुलना करायची झाल्यास पुर्वीची पाचवी ही आत्ताच्या दहावीच्या

बरोबर, पुर्वीची सातवी ही आत्ताच्या बारावीच्या बरोबर तर पुर्वीचे मॅट्रीक हे आत्ताच्या पोस्ट ग्रॅज्युएटच्या बरोबर होते. यावरून शिक्षणाच्या दर्जात किती फरक पडला आहे हे समजून येईल. अण्णाचे थोरले बंधु केशव ( उर्फ दादा ) 5 वी पर्यंत, दुसऱ्या नंबरचे थोरले बंधु यशवंत ( उर्फ नाना ) 8 वी पर्यंत, तर तीसऱ्या नंबरचे थोरले बंधु महादेव ( उर्फ तात्या ) 11 वी पर्यंत शिकलेले होते.

अण्णाचे वडील पाचवी पर्यंत शिकलेले होते. आई तर संपुर्णपणे अशिक्षीतच होती. पण ते दोघेही शिक्षणाचे महत्व ओळखुन होते. आपल्या मुलांनी चांगले शिकावे, सरकारी नोकरी मिळवावी अशी त्यांची इच्छा होती. त्यामुळे त्यांचे शिक्षणासाठी भरपुर प्रोत्साहन होते. अण्णाच्या तिनही वडील भावांना शिक्षणात फारसा रस नव्हता. पण अण्णा वेगळा निघाला. त्याचे अभ्यासात चांगले डोके चालत असे. त्यामुळे हा मुलगा काहीतरी वेगळे करील असे वडिलांना वाटत होते. अण्णाने वडिलांना निराश केले नाही. अण्णाला गणिताची गोडी लागली. बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार अण्णा पटपट शिकला. त्यावेळी शाळेत अंकगणित हा विषय होता. त्यामधे काळ, काम, वेगाची गणिते असायची. या ठिकाणी अण्णाची गाडी अडायची. ही गणिते नीट समजायची नाहीत. पण यासाठी अण्णाला त्याच्या घरातच एक गुरु भेटला. ते म्हणजे अण्णाचे वडील. त्यावेळी गावांत गुंडाजी शिर्के म्हणून एक मास्तर होते. त्यांना गणिते सोडवता येत व गावातील पत्रे वाचता येत. अण्णाचे वडील शिर्के मास्तरांना भेटून गणित शिकून घेत व घरी येऊन अण्णाला शिकवत. त्यामुळे अण्णाचा गणित हा विषय पक्का होत गेला. वडीलांना तुकारामांचे अभंग, रामरक्षा तोंडपाठ येत असे. वडील अण्णाचे पाठांतर करून घेत. तसेच अर्धांकी, पाऊणकी, दिडकी रोज संध्याकाळी मांडीवर बसवून शिकवत असत. चुकले की अण्णाला मांडीवरच माराचा प्रसाद खावा लागे. पाठांतर करताना सतत मानसिक ताण असे. त्यामुळे पाढे चुकत. पण अण्णाच्या वयाची इतर मुले मात्र सहज पाढे म्हणत. त्यामुळे अण्णाला लहानपणी अपमान सहन करावा लागला पण ही मुले पुढील आयुष्यात फारशी प्रगती करु शकली नाहीत.

कोरेगांव हे तालुक्याचे ठिकाण अण्णाच्या गावापासून 5 किलोमीटर अंतरावर होते. पण वयाची 10 वर्षे होई पर्यंत अण्णा या गावी कधी गेला नव्हता. त्यावेळी कोरेगांवात वीज होती व बटण दाबल्यावर दिवा लागतो एवढेच अण्णाला ठाऊक होते. पण त्याची पाचविची परिक्षा कोरेगावला झाली व अण्णाला आठवडाभर कोरेगावला रहावे लागले.

अण्णाची आई रोज भावाबरोबर त्याच्यासाठी भाकरी किंवा महाध्या(शेंगदाण्याचे कालवण) करून फडक्यात बांधुन पाठवत असे.

अण्णा पाचवीत असताना त्याच्या थोरल्या भावाचे लग्न झाले. कुटुंबाची आर्थिक परिस्थिती आधीच तोळामासाची होती. त्यात खाणारे अजून एक तोंड वाढले. वडिलांचे व आईचे कधी पटले नाही. आईला चहा पिण्यास बंदी होती. आई चोरून गुळाचा चहा दुधाशिवाय प्यायची. कप बशी हा प्रकार माहीत नव्हता. पितळीत चहा ओतून प्यावा लागे. शेतीचे उत्पन्न म्हणावे तेव्हडे येत नव्हते. त्यामुळे अण्णाच्या आईला इतरांचा भाजीपाला विकून गुजराण करावी लागत असे. त्याला केवद म्हणत. अशा वेळी अण्णा आईला मदत करत असे. तसे पाहिले तर अण्णा लहनपणापासूनच आईला खुप मदत करत असे. त्यामुळे आई ही अण्णाला देवासमान होती.

शेतातून पुरेसे उत्पन्न निघत नव्हते. त्यामुळे कधी कधी उपासमार होत असे. त्यामुळे आई कधी कधी माडगे करत असे व माडगे पिऊन समाधान मानावे लागत असे. तर कधी पालक उकळून खावा लागे. पण अशी गरीब परिस्थिती असूनही अण्णावर चांगले संस्कार करण्यात आले. असहाय्य परिस्थितीतही आई काम करत असे व अण्णाला पैसे देत असे. अण्णा आपल्या आईचे कष्ट लहानपणापासून बघत आला होता. त्यामुळे आईला जास्तीत जास्त आनंद कसा देता येईल असा त्याचा नेहमी प्रयत्न असायचा. अण्णाचा नेहमी वर्गात दुसरा किंवा तीसरा नंबर असायचा. रिझल्ट लागला की अण्णा नेहमी आईच्या पाया पडायचा. त्यामुळे त्या माऊलीला खुप आनंद व्हायचा. तिच्या डोळयांत आनंद दिसायचा. माणसाला समाधान काय असते त्याचा अनुभव अण्णाला यायचा.

अण्णाला आपल्या आईबद्दल जो जिव्हाळा वाटत होता तेव्हडा वडिलांबद्दल वाटत नव्हता. उलट त्यांच्याबद्दल थोडीशी भितीच वाटायची. तसे पाहिले तर अण्णाचे वडील पण ज्ञानी आणि विद्वान होते. ते सत्यप्रकाशसारखे ग्रंथ वाचणारे, ज्ञानेश्वरीवर भाष्य करणारे, तुकारामाचे अभंग सकाळी अंधारात पुर्णपणे म्हणणारे होते. ते स्पष्टवक्ते, शिस्तप्रिय होते. गावच्या सरपंचांनी वडिलांना शाळेवर देखरेख ठेवण्यास सांगितले. ते पक्के शिस्तीचे असल्यामुळेच शाळेच्या वेळेच्या आधीच गजराचे घड्याळ घेऊन बसत असत. मुलांवर चांगले संस्कार व्हावेत म्हणून शाळेतील शिक्षकांनी व्यवस्थित केस कापून वेळेवर शाळेत यायला पाहिजे असा त्यांचा आग्रह असायचा. अण्णाच्या गावांत ज्ञानेश्वरी मोठ्याने वाचणारे एक गृहस्थ होते. ज्ञानेश्वरी मोठ्याने वाचली की चांगली समजते असा त्यांचा समज होता.

आत्तासारखा आवाजाचा गोंगाट नसायचा. गाड्यांचे टी.व्ही.चे आवाज नसायचे. संध्याकाळी गाव कसे शांत असायचे. अशा वेळी कंदिलाच्या उजेडात प्रवचन चालायचे. त्यावेळी ते गृहस्थ ओविचा अर्थ पण सांगायचे. एकदा अण्णांचे वडील हे प्रवचन ऐकायला गेले. त्यावेळी एका ओविचा अर्थ चुकीचा सांगण्यात येत असल्याचे त्यांच्या लक्षात आले. चुकीचा अर्थ सांगून लोकांची धुळफेक करु नका असे सांगायला अण्णाचे वडील कचरले नाहीत. पण कॉलेजमधे जाईपर्यंत अण्णाला त्याच्या वडिलांची खरी किंमत कळली नाही याची आता खंत वाटते.

तडवळ्यांत सातवीपर्यंत शाळा होती. सातवीची परीक्षा पास झाल्यावर अण्णाची रवानगी सातारा रोड येथील कुपर इंग्लीश स्कुल या हायस्कुल मध्ये झाली. हे त्या काळी नावाजलेले हायस्कुल होते. आसपासची पंचक्रोशीतली मुले या शाळेत येत असत. ही शाळा गावापासून पांच किलोमीटर दूर होती. रोज पायी जावे लागायचे. कारण सायकल घेण्याएवढे पण पैसे नव्हते. रोज रेल्वेच्याकडेने अनवणी पायाने जावे लागायचे. कारण चप्पल घ्यायला पैसे नव्हते. जाड मांजरपाट कापडाचा एक शर्ट व एक खाकी चड्डी एवढेच काय ते कपडे होते. पायात चप्पल नसल्यामुळे धारदार खडीने कधी कधी पायातून रक्त यायचे. अण्णाच्या वर्गात श्रीमंतांची मुले आणि मुली होत्या. त्यांचे कपडे चांगले असायचे. त्यामुळे त्यांच्यासमोर जायला अण्णाला लाज वाटायची. मुली आपल्याकडे बघून हसतील असे उगीचच वाटायचे. त्यामुळे शाळेत जाणे नको असे त्याला वाटायचे. मग त्याची आई समजुत काढायची. आपल्याकडे पैसे असते तर जरुर चांगले कपडे घेतले असते. तु भरपुर शिक्षण घे, मोठा हो व मग हवे तसे कपडे घे असे जवळ घेऊन प्रेमाने सांगायची.

पावसाळ्यात तर फार हाल व्हायचे. धो-धो पाऊस पडायचा. नदी-नाले भरून वहायचे. गावाशेजारून वांगना नदी वाहते. वांगना नदिला पुर यायचा. अशा वेळी नदी ओलांडणे अशक्य व्हायचे. छत्री हा प्रकार गरीबीमुळे माहीत नव्हता. आई भली मोठी गोणपाटाची खोळ करून द्यायची. त्या गोणपाटाखाली रस्सिने डोक्याला बांधलेले दप्तर असायचे. पाणउतार बघून नदीत उतरावे लागायचे. उतार असेल तरच नदी पलीकडे जाता येत असे. नाहीतर शाळा बुडवावी लागे. शाळा जवळ आल्यावर ती गोणपाटाची खोळ बाभळिच्या किंवा बोरिच्या एखाद्या झुडपात लपवून ठेवावी लागे. शाळा सुटली की तशीच पदयात्रा पुन्हा सुरु होई. थंडीच्या दिवसात अगर पावसाळयात नदीवर आंघोळ करणे भाग होते. फार थंडी असेल तर जवळच्या नरसोबाच्या मंदीरात बैठका काढून अंग गरम करावे लागायचे. पावसाळ्यात शर्ट पिळून सुकवावा लागायचा. मनासारखा मोबाईल फोन मिळाला नाही

म्हणून रुसून बसणाऱ्या आजच्या जमान्यातील शाळकरी मुलांना शिक्षणासाठी काय कष्ट घ्यावे लागतात याची काय कल्पना असणार? खर तर लहान मुलांना मोबाईल फोन घेऊन देऊ नयेत असे अण्णाचे स्पष्ट मत आहे.

याच शाळेत अण्णाला जमदग्नी सर भेटले. ते गणित उत्तम शिकवायचे. अवघड विषय सोपा करून सांगण्याची त्यांची हातोटी  विलक्षण होती. ते गणित तर जीव ओतून शिकवायचे. तेथेच त्यांनी अण्णाच्या बीजगणीताचा पाया घातला. ते द्रोणाचार्य असत तर अण्णासारखे विद्यार्थी अर्जुनाची भुमिका वठवत असत. ते भरपुर व्यायाम करून घेत. आण्णाच्या आयुष्यातील पहिला गुरु म्हणजे त्याची आई व दुसरे गुरु म्हणजे जमदग्नी सर. अण्णाचे ठाम मत आहे की ज्या माणसाला गणित समजले त्याला इतर विषय सहज समजतात व सहज सोपे होतात.

55 टक्के मार्क मिळवून अण्णा मॅट्रीक झाला व त्याच्या घराण्यातील सर्वात जास्त शिकलेला माणूस झाला. पूर्वी आता सारखे मार्क्स पडत नसत. 50 टक्क्यांच्या वरती मार्क्स पडले तरी भरपुर आनंद व्हायचा. एकूण 40 विद्यार्थी परिक्षेला बसले होते. त्यातील 16 जण पास झाले. सदाशीवराव मॅट्रीक झाले याचा सर्वात जास्त आनंद त्याच्या आईला झाला. मॅट्रीक झाल्यावर अण्णाच्या शिक्षणाला पुर्णविराम लागेल असे वाटत होते.पण तसे काही व्हायचे नव्हते.

## हिंमते मर्दा

## तीन

लहानपणापसूनच आपण काहीतरी वेगळे करावे, काहीतरी नवीन करावे असे अण्णाच्या डोक्यात येत होते. पण काय करावे हे समज नव्हते. तसे हे समजण्याचे वय पण नव्हते व घरची परिस्थिती पण यासाठी अनुकुल नव्हती. उलट मॅट्रीक झाल्यावर ‘आता पुरे झाले शिक्षण’ असे म्हणून शिक्षणाला पुर्ण विराम लागून शेतीच्या कामासाठी आपली रवानगी होते की काय अशी अण्णाला भिती वाटत होती. पण नशीब अण्णाच्या बाजुने होते.

अण्णाचे वडील बंधु महादेव उर्फ तात्या वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून मिलिटरीमधे भरती झाले होते. त्यावेळी त्यांचे पोस्टींग पुण्याला होते. अण्णाने पुण्याला येऊन पुढे कॉलेजमधे शिकावे अशी त्यांची इच्छा होती. घरच्यांचाही याला पाठींबा होता. त्यामुळे अण्णाचा पुढील शिक्षणाचा मार्ग मोकळा झाला. त्याने पुण्याच्या एम. ई. एस. कॉलेजमधे ( हल्लिचे आबासाहेब गरवारे कॉलेज) मधे ॲडमीशन घेतली. या कॉलेजमधे प्रवेश घेण्याचे कारण म्हणजे ग्रामीण भागातून आलेले विद्यार्थी या कॉलेजमधे जास्त असत. पण त्याने सायन्स साईडला ॲडमीशन घेतली. ग्रामीण भागातून आलेले विद्यार्थी सहसा सायन्स साईडला येत नसत. पण अण्णा आला कारण काहीतरी वेगळे, काहीतरी हटके करायचे म्हणून.

अर्थात त्याचा हा शिक्षणाचा मार्ग काही सुकर नव्हता. त्यातही अनंत अडचणी होत्या. मुख्य म्हणजे पैशांचा प्रश्न होता. वडिलांनी गावातील एका शेठकडून व्याजाने पैसे घेऊन हा प्रश्न सोडवला. शिक्षणाच्या निमित्ताने तडवडळेसारख्या एका छोट्या गावातून पुण्यासारख्या मोठ्या  शहरात प्रवेश करणे हा अण्णाच्या जीवनातील फार मोठा टर्निंग पॉईंट ठरणार होता. गांवातून शहरात शिकायला जाणारा अण्णा दुसरा किंवा तिसरा मुलगा होता. त्यामुळे गावकऱ्यांना अप्रूप वाटत होते व अण्णाला पुण्याला पाठविण्याच्या तयारिला जोमाने सुरवात झाली होती. आईने गाडग्यात साठवून ठेवलेल्या पैशातून अण्णाला पहिल्यांदा चांगले कपडे

म्हणजे छानसा सुती शर्ट व पायजमा शीवला. गावातील कुंडला चांभाराकडून कोल्हापुर घाटनिची जाडजुड चप्पल शिवून घेतली. ही त्याच्या आयुष्यातील पहिली चप्पल.

पुण्याला शिकायला जायला मिळणार म्हणून एकीकडे अण्णाला आनंद होत होता तर आईपासून दूर जावे लागणार म्हणून वाईट पण वाटत होते. कारण अण्णा आईचा फ़ार लाडका होता. तो पण आईला जास्तीत जास्त मदत करायचा प्रयत्न करायचा. आई शेतात किंवा बाजारात गेल्यावर उशीर झाला तर आईला त्रास होऊ नये म्हणून तो चुल पेटवून ठेवत असे, पीठ चाळून ठेवत असे. अणाच्या वडीलांना आई चहा प्यायची हे आवडत नसे. मग अण्णा आईसाठी भगुल्यात गपचुप चहा बनवून ठेवत असे. जेणेकरून तिचा त्रास कमी व्हावा. उन्हाळ्यात आई शेवया वळायची तेव्हा त्या तारा अण्णा गोळा करायचा. असा मुलगा आपल्यापासून दूर जाणार याबद्दल त्या माऊलीला वाईट वाटणे साहजिकच होते.

त्यावेळी आत्तासरखी एस.टी. गाड्यांची सोय नव्हती. कोल्हापुरहून पुण्याला कोरेगावमार्गे एक रेल्वे गाडी जायची. ती गाडी कोरेगावला दुपारी बारावजता यायची. ही गाडी पकडण्यासाठी सकाळपासूनच अण्णाची गडबड चालु होती. आईच्या सांगण्यावरून गावातील सगळया देवांच्या पाया पडून झाले. गावातील सर्व थोरांना नमस्कार करून झाले. सकाळपासून तर आई सारखी रडत होती. 12 वाजता येणारी गाडी चुकु नये म्हणून केव्हडी गडबड उडाली होती. घरचा व शेजाऱ्याचा बैल बांधुन बैलगाडी तयार झाली. जुनी लोखंडी बॅग, त्यात एक पिशवी, एक घोंगडी या सामानासह अण्णा गाडीत बसला. बरोबर आई, भाऊ होतेच. कोरेगाव स्टेशनात पुण्याला जाणारी गाडी येईपर्यंत अण्णा आईच्या कुशीत लहान मुलासारखा रडत होता. पण एकदा गाडी आली मग मात्र अण्णाला कशाचे भान राहिले नाही. एक वेळ कर्कश शिट्टी देऊन गाडी पुण्याकडे चालु लागली. पुणे स्टेशनवर ऊतरल्यावर अण्णा पार बावचळून गेला होता. कोठे व कसे जायचे हे त्याला समजत नव्हते. एकतर रिक्षाने प्रवास किंवा टांग्याने प्रवास! त्यावेळी पुण्यामधे टांग्यांचे प्रस्थ अधिक होते. टांगेवाला फसवील की काय या भितीने अण्णा एकदाच टांग्यांत बसला. ऊंच ऊंच इमारती बघून अण्णा पूर्णपणे बावरला होता.

पुण्याला अण्णाच्या कॉलेजची सुरवात अडखळतच झाली. त्याची जेवणाची व रहाण्याची सोय महिना 45 रुपयांमधे सदाचार वस्तीगृहात झाली. अनाथ विद्यार्थीगृहाचा विभाग म्हणून हे वस्तीगृह चालवले जाते. तिथले सर्व नियम अनाथ विद्यार्थीगृहाप्रामाणेच कडक होते. भल्या पहाटे उठावे लागे. त्यानंतर रामरक्षा म्हणावी लागे. खोलीच्या

स्वच्छतेपासून ते ताटे धुण्यापर्यंत सगळी कामे करावी लागत. त्यावेळी रत्नपारखी म्हणून रेक्टर होते. ते फार कडक शिस्तीचे होते. पण अण्णा चिखल मातीत वाढला असल्यामुळे तेथे त्याला घरच्यासारखे वाटे. त्याच्या खोलीत पुण्याचे माजी खासदार रामकृष्ण मोरे रहात होते. एस.एस.सी बोर्डात सातवे आलेले दिक्षीत म्हणून होते. तसेच धारप म्हणून एक पार्टनर होते. अण्णांचे त्यांच्याशी चांगले सुर जुळले होते.

पुण्याला येईपर्यंत अण्णाने आपण काय व्हावे, पुढे काय करावे याचा काहीच विचार केला नव्हता. तो कोणीतरी मोठ्ठा व्हावा असे त्याच्या आईवडिलांना वाटत होते. अण्णा हा त्याच्या गावांतून पुण्याला शिकायला येणारा दुसरा किंवा तिसरा मुलगा होता. गावकऱ्यांना त्याचे अप्रूप होते. त्यामुळे अण्णाच्या आईवडिलांची गावात प्रतिष्ठा वाढली होती. त्यांना गरिबीतही श्रीमंतांचे सुख मिळत होते.

अण्णाचा कॉलेजचा पहिला दिवस तर विचका करणारा निघाला. आधीच तो खेडेगावातून आलेला. कॉलेज म्हणजे काय याची अजिबात कल्पना नसलेला. त्याने बीचकत बीचकत वर्गात प्रवेश केला. ओळखीचे कुणीच दिसत नव्हते. सगळी मुले चांगले कपडे घालून आली होती. पायजमा घातलेले तीन चार जणच होते. बहुतेक मुले इंग्लीशमधुन बोलत होती. वर्गात बऱ्याच मुली पण होत्या. त्या पण हसत होत्या. आजपर्यंत अण्णा कधी कुठल्या मुलीशी बोललासुद्धा नव्हता. हे बघून अण्णा चांगलाच नर्व्हस झाला होता. तेवढ्यात किरकोळ बांध्याच्या एक बुटकेल्याश्या बाई वर्गात आल्या. त्यांच्यावर मुलांनी मागून कागदी बाण मारले. हे बघून तो हादरूनच गेला. गुरुजनांबद्दल आदर दाखविण्याची ही पद्धत बघून अण्णाला फार वाईट वाटले. त्या बाईंचे नांव कु. साने असल्याचे त्याला नंतर कळले. पंचेचाळीस मिनिटांच्या भाषणात त्या बाई काय बोलल्या यातले एक अक्षरसुद्धा अण्णाला कळले नाही. कारण त्या इंग्रजीत बोलत होत्या तर अण्णाला इंग्रजी समजत नव्हते. सगळे लेक्चर डोक्यावरून गेले. त्या सारखा लिव्हींग व नॉनलिव्हींग हे शब्द उच्चारत होत्या पण त्या साध्या शब्दांचा अर्थही त्याला माहीत नव्हता. याला कारण त्याचे इंग्रजीचे अज्ञान.

अशा रितीने अण्णाची पहिल्या दिवशीच दांडी उडाली. त्यामुळे तो मनाने पार खचून गेला. हे शिक्षण जमेल की नाही याचीच त्याला काळजी वाटु लागली. त्या रात्री अण्णाला जेवण तर गेले नाहीच पण झोप पण लागेना. तो रात्रभर नुसता विचार करत तळमळत होता. पळून जावेसे वाटु लागले होते. लगेचच गावांला परत जाण्याचे विचार सुरु झाले होते. जवळ धीर द्यायला कोणी नव्हते. आईची तीव्रतेने आठवण येत होती. रात्री बऱ्याच

उशिरा त्याला झोप लागली. रात्री आई स्वप्नात आली व म्हणाली, ‘ तु प्रयत्न कर. तुला न येणारी गोष्ट दुसऱ्याला विचार. त्यात लाज कसली? हळुहळु सगळे काही कळेल, सगळे येईल.’

अण्णाने दुसऱ्या दिवसापासूनच आईचा उपदेश अमलात आणायला सुरवात केली. दुसऱ्या दिवशी आंघोळ केल्यावर आईचे नामस्मरण करून आदल्या दिवसाच्या दोन्ही शब्दांचे अर्थ रुममधल्या दिक्षीतला विचारले. मग पुढे अण्णा जे जे काही अडे ते रुममधील मित्रांना विचारत असे. त्यांच्याकडून समजाऊन घेत असे. त्यामुळे हळु हळु शिक्षणाची गोडी वाढत गेली. मधुन मधुन आईची तीव्रतेने आठवण यायची. गावी जाऊन आईला भेटून यावेसे वाटयचे. पण तेवढ्यात थोरले बंधु आईने केलेले लाडु घेऊन यायचे. अण्णा ते सर्वांना देत घरच्या गंमती सांगत असे. मित्रांना घरी केलेले व आईने दिलेले लाडू आवडायचे.

कॉलेजमधील शिक्षण तसे कष्टदायक ठरत होते. कारण अण्णाचे सदाचार वसतिगृह कॉलेजपासून पाच किलोमीटर होते. सायकल नसल्यामुळे हे अंतर त्याला पायी चालावे लागे. सकाळी लवकर उठून पायपीट करत सहा वाजेपर्यंत कॉलेजमधे जावे लागे. गेल्यावर उभ्यानेच प्रॅक्टीकल करावे लागे. दुपारचे जेवण करायलासुद्धा वेळ मिळत नसे. चहासुद्धा पिण्याची पंचाईत होती. मग संध्याकाळी पोटात भुकेने कावळे ओरडायला लागायचे. चार आण्याचे मुरमुरे खाऊन व भरपुर पाणी पिऊन भागवून न्यावे लागायचे. याचा अण्णाला फार त्रास व्हायचा. तरी पण तो कॉलेजमध्ये रुळला. त्याने एन.सी.सी. जॉईन केली. हल्लिचे मराठी नाट्यसृष्टी व मराठी तसेच हिन्दी चित्रपट सृष्टीतले लोकप्रिय अभिनेते विक्रम गोखले अण्णाचे एन.सी.सी. मधले इन्स्ट्रक्टर होते.

सहामाहिची परिक्षा झाली आणि अण्णाची दिवाळीच्या सुट्टीत गावी जायच्या तयारीला सुरवात झाली. पुण्याला आल्यानंतर अण्णा पहिल्यांदाच गांवी जाणार होता. सुट्टीत काय करायचे, बरोबर काय न्यायचे याचे बेत ठरु लागले. गावांतील लोक आपल्याला मान देतील, फराळाला बोलावतील, कोणत्या वर्गात शिकतो असे विचारतील असे अण्णाला वाटू लागले. दिवाळीच्या सुमारास शेजारच्या शेतात भरपुर सिताफळे यायची. ती अण्णाला खुप आवडायची. त्याची त्याला तीव्रतेने आठवण येऊ लागली. अण्णाच्या आईला चहा फार आवडे. पण वडिलांना ते पसंत नव्हते. मग आई चोरून चहा प्यायची. म्हणून अण्णाने लक्ष्मी रोडवरच्या किवळकरांच्या दुकानातून पाव किलो चहा घेतला. बरोबर नेण्यासाठी दोन रुपयाचा पाव घेतला. कारण अण्णाला तेवढेच परवडण्याजोगे होते. दुसऱ्या दिवशी त्या मायलेकरांनी तो चहा पाव अगदी आनंदाने खाल्ला. त्यावेळी आईच्या चेहेऱ्यावर पंचपक्वान्ने

खाल्याचे समाधान उमटले होते. गरिबीतही आनंद कसा शोधायचा हे अण्णाला चांगले माहीत झाले होते. सगळे काही असूनही उगीचच दुःखी असणाऱ्या आजच्या तरुण पिढिला यातून बरेच काही शिकता येईल.

पण लौकरच अण्णाच्या आयुष्यात अजून एक मोठा चेंज येणार होता. त्यामुळे त्याच्या आयुष्याला एक वेगळीच दिशा मिळणार होती.

## हिंमते मर्दा

### चार

अण्णाचे पहिले वर्ष एम. ई. एस कॉलेजमधे व्यवस्थित पार पडले. मग त्याने वसतिगृह बदलले. तो सदाचार वसतीगृहातून डेक्कन जिमखान्यावरील महात्मा फुले वसतिगृहात( हल्लिचे डेक्कन पार्क हॉटेल) आला. तसेच कॉलेज बदलून जवळच्या फर्ग्युसन कॉलेजमधे आला. या दोन चेंजेसनी अण्णाच्या जीवनात आमुलाग्र क्रांती घडवली. त्याच्या विचारांना दिशा मिळाली आणि एक जिवाभावाचा जिवलग मित्र पण मिळाला.

आपल्यावर मनापासून नितांत प्रेम करणारा मित्र मिळण्याचे भाग्य फार थोड्या लोकांच्या नशिबी असते. पण या ठिकाणी मात्र अण्णा खरोखरच नशीबवान ठरला. विकास पाटोळेच्या रुपाने अण्णाला असा मित्र मिळाला. खरे म्हणजे विकास व अण्णा ही लॉरेल हार्डी किंवा जाड्या रड्या सारखी एक वीसंगत जोडी होती. कारण विकास श्रीमंत घरचा होता. त्याच्या वडिलांचे लक्ष्मी रोडवर चष्म्याचे दुकान होते. स्वारगेटजवळ मुकुंदनगरमधे मोठा बंगला होता. त्याच्याकडे नेहमी पैसे खुळखुळत असायचे आणि त्याची एक प्रेयसी पण होती. याऊलट अण्णा म्हणजे गरीब, लाजाळु, एकदम साधा आणि सरळ, सुपारिच्या खांडेचे पण व्यसन नसलेला. पण विकास व त्याच्या प्रेयसिला अण्णा आवडायचा. ते मग त्याला हॉटेलमधे घेऊन जाऊ लागले. एकदा विकास अण्णाला त्याच्या घरी घेऊन गेला. तो कोणतातरी सण होता व अण्णाला आईची आठवण येत होती. विकासच्या आईवडिलांनी अण्णाचे प्रेमाने स्वागत केले. विकासच्या आईने तुप लावून साजुक पोळया केल्या होत्या. अण्णा दिवसभर त्यांच्याकडे होता. मग पुढे स्नेह वाढत गेला व अण्णा त्यांच्या घरचाच झाला. विकासची आई मासळीचे कालवण खुप छान करायची. ज्यावेळी ती अण्णाला जेवायला बोलवायची ती हे कालवण हमखास करायची. विकासचे वडील स्वभावाने फार चांगले होते. ते नेहमी अण्णाची आत्मीयतेने चौकशी करत. एक गरीब शेतकऱ्याचा मुलगा पुण्याला येऊन शिकत आहे याचे त्यांना फार कौतुक वाटायचे. ते स्वतः पुण्याला येऊन रस्त्यावर उभे राहून चष्मे विकायचे. ते मुळचे रत्नागिरीचे होते. हळु हळु अण्णाच्या घरची खरी परिस्थिती त्यांना कळून आली. ते

अण्णाला तु सरळ व भाबडा आहेस असे म्हणत. विकासच्या आईवडिलांच्या रुपाने अण्णाला पुण्यात जणु काही दुसरे आईवडीलच मिळाले.

अण्णा रहात होता ते महात्मा फुले वसतीगृह बोरावके व गीरमे या माळी समाजातील यशस्वी उद्योजकांनी खास शेतकरी मुलांसाठी म्हणून बांधले होते. त्यांची डेक्कन जीमखान्यावर बरीच प्रॉपर्टी होती. त्यांनीच सोलापुर जिल्ह्यात माळीनगर येथे पहिला साखर कारखाना सुरु केला होता. ही मंडळी समाजासाठी सतत काहीतरी विधायक कार्य करीत असत. माजी आमदार बाळासाहेब शीवरकर हे त्या काळी या होस्टेलमधे रहात असत. या ठिकाणी अण्णाच्या विचारांना योग्य दिशा मिळू लागली.

अण्णा एफ. वाय. बि. एस्सी. ला असताना एक दुःखद घटना घडली. वार्षिक परिक्षा अवघी पंधरा दिवासांवर आली असताना त्याला घरून वडील गेल्याची तार आली. एका दुर्दैवी अपघातात त्याच्या वडिलांचा मृत्यु झाला होता. अण्णाच्या आईला बरे नव्हते. म्हणून ते औषध आणायला कोरेगांवला गेले होते. परत येताना ते आपल्या शेतातून येत होते. त्यावेळी त्यांच्या मारक्या बैलाने अचानक त्यांच्यावर हल्ला केला. बैलाच्या शिंगाचा वर्मी घाव बसला व त्यात ते गेले. ही तार वाचून अण्णा सुन्न होऊन बसला. काय करावे हे त्याला कळेना. मग त्याच्या मित्रांनी त्याला रात्रीच एस.टी. बसमधे बसवून दिले व अण्णा पहाटेला घरी पोचला. वडील नसल्याची पहिल्यांदाच जाणीव झाली. अण्णाने खुप शिकावे अशी त्याच्या वडिलांची इच्छा होती. त्याने मन आवरले. वडिलांची इच्छा पुर्ण करायची होती म्हणून जड अंतःकरणाने त्याच दिवशी पुण्याला परतला.

हा हा म्हणता वर्ष संपले. अण्णा वार्षिक परिक्षा देऊन गांवी परत आला. पण आपण पास होऊ की नाही याची त्याला भिती वाटत होती. अण्णाच्या गावांतील, त्याच्या शेजारपाजारचे लोक त्याच्याकडे वेगळया नजरेने बघु लागले होते. तो कॉलेजला पुण्याला आहे हेच त्यांच्या दृष्टीने नवलाची गोष्ट होती. पेपर तर चांगले गेले होते. पण आपण जर पास झालो नाही तर आपल्याबरोबरच आपल्या घराला पण कमीपणा येईल अशी धास्ती अण्णाला वाटत होती. पूर्वी परिक्षा निकाल पेपरमधे जाहीर व्हायचा, कारण शिक्षण घेणाऱ्या मुलांची संख्या कमी होती. निकालाच्या दिवशी त्याचा मोठा भाऊ रात्रीच कोरेगावला पेपर आणायला जाऊन बसला होता. कारण पेपरमधे रिझल्ट येणार होता. पहाटे पाच वाजता पेपर आला. अण्णा पास झाला होता. घरात आनंद पसरला. उसने पैसे घेऊन पेढे आणले. मारुतिपुढे ठेवण्यात आले. आईने गुळ घालून खीर केली व सण साजरा केला. वडील गेल्यावर पहिल्यांदाच घरात गोडधोड झाले.

अण्णाने एम.ई.एस. कॉलेज बदलून फर्ग्युसन कॉलेजमधे प्रवेश घेतला कारण एम.जे.होस्टेल व फर्ग्युसन कॉलेज जवळ होती. रोजची पायपीट वाचणार होती. तसे फर्ग्युसन कॉलेज पुण्यात पहिल्यापासून नावाजलेले होते.

फर्ग्युसन कॉलेजमधील वातावरण व पुण्यनगरीतील वास्तव्य यामुळे हळु हळु अण्णात सकारात्मक बदल घडु लागले होते. पुणे शहर खरोखरच ज्ञानाचा खजिना आहे. प्रत्येकाने या खजिन्यातून हवे ते काढून घ्यावे व आपल्या आयुष्याचे सोने करावे ही गोष्ट अण्णाच्या चांगलीच लक्षात आली होती. याचा पुरेपुर उपयोग करून घ्यायचे त्याने ठरविले.

अण्णाला वाचनाचे वेड लागले. त्याने निरनिराळ्या प्रकारची अनेक पुस्तके वाचायचा सपाटा लावला. आवडलेले पुस्तक एका रात्रीत वाचून संपवू लागला. याच काळात त्याने ना. सी. फडक्यांची दौलत ही कादंबरी वाचली. खांडेकरांच्या कथा, कादंबऱ्या वाचल्या. श्रीमान योगी वाचून तो भारावून गेला होता. साने गुरुजींचे लेख सर्वात प्रिय होते. पुण्यात त्यावेळी नुकतीच उद्योग धंद्याला सुरवात झाली होती. मोजकेच मराठी उद्योजक पुढे येत होते. बालगंधर्व नाट्यगृहाचे बांधकाम अण्णाच्या डोळयादेखत झाले. त्याचे बांधकाम करणारे बी.जी.शिर्के हे पण सातारा जिल्ह्यातील पसरणी या गावचे. त्यामुळे अण्णाला त्यांच्याबद्दल अभिमान वाटु लागला होता. त्याच्या होस्टेलमधे अनेक मोठमोठे कारखानदार येत होते. बोरावके, किर्लोस्कर, गरवारे यांच्या चरित्रावर अण्णा विचार करायचा. हे लोक मोठे कसे झाले? त्यांना प्रेरणा कोठून मिळाली? मला पण त्यांच्यासारखे बनता येईल का? या विचारांनी अण्णाचा पिच्छा पुरवायला सुरवात केली. कारखानदार होण्यावे वेड हळु हळु डोक्यात मुळ धरु लागले. पुण्यात अनेक व्याख्याने होत. ती शनिवार वाड्यावर असोत की गोळिबार मैदानावर असोत, अण्णा ती ऐकायला चालत जात असे.

यशवंतराव चव्हाण हे महाराष्ट्र राज्याचे पहिले मुख्यमंत्री होते. ते खऱ्या अर्थाने महाराष्ट्राचे भाग्यविधाते होते. त्यांनी व वसंतदादा पाटील यांनी मिळून महाराष्ट्रात सहकाराची मुहुर्तमेढ रचली. राज्यात सहकाराचा पाया घातला. जिल्हा परीषदा स्थापन केल्या. सर्व थरातील लोकांशी त्यांनी संपर्क प्रस्थापीत केला होता. अण्णा या सगळयाचा मागोवा घेत होता. या लोकांसारखेच आपण पण का मोठे होऊ शकणार नाही या विचाराने त्याचा पिच्छा पुरवला. हळु हळु अभ्यासाचे वेड कमी होऊन हेच वेड वाढु लागले. लहानपणापासूनच अण्णाच्या मनांत काहीतरी वेगळे, काहीतरी हटके, काहीतरी नवीन करायचे वेड होतेच. त्याला खत पाणी मिळू लागले.

## हिंमते मर्दा

## पाच

एफ. वाय नंतर अण्णाची इंजिनीअरींगला जायची इच्छा होती. पण त्याला इंजिनीअरींगला प्रवेश मिळाला नाही. का नाही मिळाला हे काही कळले नाही. मग त्याने एस. वाय. बी. एस्सीला ऍडमीशन घेतली. पहिल्यापासूनच प्रॅक्टिकल्सचा कंटाळा येत होता. गणित विषयाला प्रॅक्टिकल्स नसायचे. तसेच गणित हा अण्णाच्या आवडीचा पण विषय होता. म्हणून त्याने बी.एस्सीला. स्पेशल गणित हा विषय नीवडला.

महाराष्ट्र टाईम्समधे आलेला एक लेख अण्णाच्या वाचनात आला. कोल्हापुर येथील दिवसाला दहा पोती कच्ची साखर बनविणाऱ्या एका लघु साखर कारखान्याची माहिती त्यात दिली होती. रोज किती साखर नफादायक रित्या तयार करता येईल याची कल्पना त्या लेखात दिली होती. अण्णाला तो लेख फार आवडला. त्याने तो लेख पुन्हा पुन्हा वाचला. अशा प्रकारच्या लघु साखर कारखान्याची कल्पना त्याला फार आवडली. अशा प्रकारचे लघु उद्योग जर खेडो पाडी सुरु झाले तर खऱ्या अर्थाने गावांचा विकास होईल. गावातील तरुणांना आपल्या गावातच रोजगार मिळेल. हल्ली गावातील तरुण रोजगार मिळविण्यासाठी मोठ्या संख्येने शहराकडे धाव घेत आहेत. त्यांना रोजगार मिळविण्यासाठी शहरात यायची जरुरी भासणार नाही हे अण्णाने अचुक ओळखले. असा एखादा कारखाना आपण आपल्या गावी काढावा. गावातील शेतकऱ्यांना उसाचा चांगला भाव देऊन त्यांचा फायदा करावा. कारखान्याला झालेल्या नफ्यातून गावात एक चांगला विनामुल्य दवाखाना काढावा असे अण्णाला तीव्रतेने

वाटु लागले. कोल्हापुरचा तो साखर कारखाना प्रत्यक्षात जाऊन बघायची तीव्र इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली. लोकांसाठी काहीतरी कारायची जिद्द मनात उभी राहिली. अण्णाला गांवाचे वेड होतेच. नवीन काही पाहिले की त्याचे मन त्याला क्षणांत गावात घेऊन जाई. कोणतीही योजना आपल्या गांवात सुरु व्हावी अशी मनोमन इच्छा तयार व्हायची.

सुट्टीत अण्णा गांवी आला होता. तेथे त्याने आपली कल्पना आपला मित्र हनुमंत माने याला बोलून दाखवली. कोल्हापुरला जाऊन साखर कारखाना बघायची इच्छा व्यक्त केली. हनुमंत मानेला बहुतेक अण्णाचे म्हणणे पटले नसावे. पण त्याने तसे बोलून दाखवले नाही. तो अण्णाबरोबर कोल्हापुरला कारखाना बघायला यायला तयार झाला.

कोल्हापुरला जायचे तर खिशात पैसे नव्हते. मग दोघांनी विना तिकीट कोल्हापुरला जायचा बेत केला. एके दिवशी भल्या पहाटे, घरात कोणाला काहिही न सांगता, ते दोघे कोल्हापुरला जायला म्हणून निघाले. अण्णाने घरातील शिळी भाकरी व चटणी फडक्यात बांधुन घेतली. दोघे कोरेगावहून बिना तिकीट कोल्हापुरला जायला निघाले. ते भर उन्हाळयाचे दिवस होते. दोघे कोल्हापुरला पोचले तेव्हा टळटळीत दुपार झाली होती. सुर्यनारायण आग ओकीत होता. दोघेही कोल्हापुरला पहिल्यांदाच येत होते. कारखाना उद्यमनगरला होता. कोल्हापुर स्टेशन ते उद्यमनगर हे अंतर चार किलोमीटर आहे. खिशात पैसे नसल्याने दोघांची पदयात्रा सुरु झाली. अण्णाच्या पायात झिजुन जिर्ण झालेल्या चपला होत्या. अण्णाचा मित्र तर अनवाणीच होता. उन्हाने रस्ता तापलेला असल्यामुळे मित्राचे पाय पोळु लागले. मग अण्णाने आपली एक चप्पल आपल्या मित्राला दिली. अशा असहाय्य स्थितीत ते दोघे फॅक्टरीच्या गेटवर पोचले. त्या आधी चपला काढून ठेवल्या होत्या. गेटवर त्यांना वॉचमनने अडवले. अण्णाने येण्याचे कारण सांगितले. पण वॉचमन काही केल्या आंत सोडायला तयार होईना. त्या दोघांचे हे बावळे रुप बघून त्याला वेगळाच संशय येऊ लागला होता. तुम्हाला हवा असलेला कारखाना कोल्हापुरहून तीस किलोमीटर अंतरावर आहे तेथे जाऊन बघा असे सांगू लागला. शेवटी हात हलवतच अण्णाला परत फिरावे लागले. कोल्हापुरची ट्रीप वाया गेली.

दोन्ही मित्रांचा विना तिकीट परतिचा प्रवास सुरु झाला. आपण विना तिकीट पकडले जाऊ अशी भिती दोघांनाही होती. तसे होऊ नये म्हणून कोरेगावच्या अलिकडे अकरा किलोमीटरवर रहीमतपुर म्हणून स्टेशन लागते, तेथे गाडीचा वेग कमी झाल्यावर हे दोन मित्र उतरले. मग सुरु झाला रहीमतपुर ते कोरेगाव अकरा किलोमीटरचा पायी प्रवास. पण यातही विघ्न आलेच. अचानक उन्हाळी पाऊस सुरु झाला. अचानक आकाशांत ढग दाटून आले. विजा

चमकु लागल्या. मुसळधार पावसाला सुरवात झाली. ठेचकाळत, पावसात भीजत, जीव मुठीत धरून हे दोन मित्र रात्रिचे एकदाचे गांवी पोचले तेव्हा भिजुन ओलेचींब झाले होते. आपण कोठे जातो आहोत हे त्यांनी घरात अजिबात सांगितले नव्हते. म्हणून त्यांना शोधायला सुरवात झाली होती. एकदाचे ते सुखरुप घरी पोचले म्हणून सर्वांच्या जिवात जिव आला.

पण एवढे होऊनही जो गप्प बसेल तो अण्णा कसला! गावकऱ्यांना या कारखान्याचे महत्व समजाऊन सांगायचे अण्णाने ठरवले. त्याने दुसऱ्या दिवशी गावकऱ्यांची सभा घेण्याचे ठरवले. अर्थात घरात कोणाला कसलीच कल्पना नव्हती. त्याने ग्राम पंचायतीच्या कार्यालयातून एक मोडके टेबल मिळवले. कोठूनतरी एक मोडकी खुर्ची आणली. बॅटरीवर चालणारा लाऊडस्पीकर मिळवला. तेथीलच एका वृध्ध व्यक्तिला अध्यक्ष केले. त्या सभेला जे काही पाच पंन्नास गावकरी जमले होते त्यांना कारखान्याची कल्पना सांगितली. त्यामुळे गावकऱ्यांचा कसा फायदा होणार आहे, गांवाचा कसा विकास होऊ शकतो हे जीव तोडून सांगण्याचा प्रयत्न अण्णाने केला. पण त्यातल्या फारच थोड्या लोकांना अण्णाचे म्हणणे पटले. बहुतेकांनी अण्णाची टरच उडवली. ‘खिशात नाही दमडा आणि निघाला कारखानदार व्हायला.’ म्हणून त्याची कुचेष्टा करून कुत्सीत टिकाच करायला सुरवात केली. कोणीतरी अण्णाच्या घरी जाऊन तक्रार केली. ‘तुमचा मुलगा बिघडला आहे. पुण्याच्या कॉलेजमधे जाऊन नको ते विचार डोक्यात आणायला लागला आहे. आपल्या घराण्यात बाप जन्मात कोणी व्यापार केलेला नाही की कारखाना काढलेला नाही. हे आपले कामच नव्हे. शेती हाच आपला वडिलोपार्जीत मुख्य व्यवसाय आहे. कारखाना काढण्याचे वेड तुमच्या मुलाने डोक्यात घेतले आहे. तुमचा हा मुलगा एक दिवस नक्कीच तुमचे दिवाळे काढेल. त्याला वेळीच आवरा.’ झाले! याचा व्हायचा तोच परिणाम झाला. नसते उद्योग करतो म्हणून अण्णाला घरच्यांची खुप बोलणी खावी लागली. पुन्हा असले उद्योग करणार असशील तर शिक्षण बंद करून गावी परत ये आणि शेतीच्या कामाला लाग म्हणून तंबी मिळाली.

अशा रितिने अण्णा पुर्णपणे पराभुत हऊन पुण्याला परतला, पण कारखानदार व्हायचे या निश्चयाने.

## हिंमते मर्दा

## सहा

अण्णाने बी.एस्सी. च्या शेवटच्या वर्षाच्या अभ्यासाला सुरवात केली. पण या वेळी काहीतरी बिघडले होते. त्याला गणित विषय एकदम अवघड वाटु लागला. अभ्यासांत मन रमेना. याचा जो व्हायचा तोच परिणाम झाला. शेवटच्या परिक्षेत अण्णाचा त्रीफळा उडाला. तो चक्क नापास झाला. आजपर्यंत अण्णाने अनेक पराभव पचवले होते, अनेकवेळा अपयश अनुभवले होते. पण आजपर्यंत त्याचा शिक्षण क्षेत्रात कधीच पराभव झाला नव्हता. अण्णाला हे अपयश पचवणे मात्र फार जड गेले. आपण नापास झाल्यामुळे आपल्याबरोबरच आपल्या कुटुंबाची पण नामुष्की झाली असे अण्णाला वाटु लागले. नापास झाल्यामुळे आता त्याला स्कॉलरशीप मिळणार नव्हती. मग त्याने पुन्हा गावातील सावकाराकडून पैसे कर्जाने घेतले व पुण्याचा रस्ता पकडला. या वेळी मात्र अण्णाने नसत्या उचापती करण्यात वेळ वाया न घालवता संपुर्ण लक्ष अभ्यासावर केन्द्रीत केले. सदाशीव पेठेतील कुलकर्णी सरांचा क्लास लावला. एक वर्ष वाया गेले म्हणून त्याला फार वाईट वाटत होते. अण्णाच्या मेहेनतिला फळ आले आणि तो बी. एस्सी. मॅथेमॅटिक्स मधे झाला.

बी.एस्सी. नंतर पुढे शिकायची अण्णाला इच्छा होती. कारण आपण जेवढे जास्त शिक्षण घेऊ तेवढे ते आपल्याला उपयोगी पडेल असा त्याचा होरा होता. म्हणून त्याने एम.एस्सी. करण्याचा निर्णय घेतला. आईला वाटत होते की मुलाला चांगली नोकरी मिळेल. चांगले दिवस येतील. बी.एस्सी. किंवा एम. एस्सी. म्हणजे काय हे तिला काय कळणार? मुलगा काहीतरी शिकला आहे एवढेच त्या अशिक्षीत खेडवळ बाईला कळत होते. ती आता फार खचली होती. तिला आता भाज्यांचे हारे उचलत नव्हते. अण्णाच्या वडील बंधुंची लग्ने झाली होती. पण तिला सुख मिळू शकले नाही. तरीसुद्धा तिने अण्णाच्या शिक्षणाला विरोध केला नाही. ती

अण्णाला म्हणाली की मी तुला हाडाची काडे करून वाढवले आहे. तुला काय निर्णय घ्यायचा असेल तो तुझा तु घे. माझा तुला पुर्ण पाठींबा आहे.

अण्णाने पुणे विद्यापिठात एम. एस्सी.ला अॅडमीशन घेतली व तो पुणे विद्यापिठाच्या वसतीगृहात रहायला आला. येथे त्याला जरा विरंगुळा मिळाला. कारखानदार व्हायचे वेड अजून डोक्यातून गेलेले नव्हते पण त्याला बराच आवर बसला होता. तेथील वातावरण जरा वेगळे, अभ्यासाचे पण उत्साही होते. रँग्लर ग. स. महाजनी त्यावेळी पुणे विद्यापिठाचे कुलगुरु होते. प्रा. हुजुरबाजार हे गणित व संख्याशास्त्र विभागाचे प्रमुख होते. प्रा. नारळीकर रिलेटिव्हिटी शिकवत. नंतर अण्णाला कळले की डॉ. जयंत नारळीकर खगोल शास्त्रज्ञ प्रा. नारळीकरांचे चिरंजीव व हुजुरबजार यांचे मेव्हणे आहेत. त्यांना सातारा, कोल्हापुरची माणसे आवडत असत. एकदा त्यांनी अण्णाची आस्थेने चौकशी पण केली होती. अशा या थोरा मोठ्यांच्या सहवासात अण्णाचे पहिले वर्ष पार पडले.

अण्णाने आता दुसऱ्या वर्षाला प्रवेश घेतला होता. कारखानदारी बद्दलचे विचार अधुन मधुन उफाळून येत असत. पण तो माठ्या मुश्किलिने या भावना काबुत ठेवत असे. आता अण्णाचे लक्ष्य शिक्षण पुर्ण करणे हे होते. त्यासाठी तो रात्रंदिवस जागून अभ्यास करत होता.

डिसेंबर महिन्यामधे अण्णाच्या मित्राचे विकास पाटोळेचे लग्न ठरले. त्याचा हा अंतरजातीय विवाह होता पण घरची त्याला संमती होती. अण्णा त्या लग्नात करवला, म्हणजे हल्लीच्या भाषेत बेस्ट मॅन असणार होता. विकासच्या आईवडिलांनी मोठ्या आग्रहाने अण्णाच्या आईला लग्नाला बोलावले होते. पण “डोक्यावरून पदर घेणारी आपली खेडवळ आई या श्रीमंतांच्या लग्नात शोभेल का?” म्हणून अण्णा जरा साशंकच होता. पण आम्हाला तुझी आई बघायची आहे असा विकासच्या आईने आग्रहच धरल्याने अण्णा आपल्या आईला आणायला तयार झाला. आई आठ दिवस पुण्याला येणार म्हणून तो खुश झाला होता. अण्णा आईला आणायला म्हणून गांवी गेला खरा पण त्याची आई यायलाच तयार होत नव्हती. तोपर्यंत त्याच्या आईने कोरेगाव पलीकडचे गाव पाहिले नव्हते. पण विकासच्या आईने आग्रह केला आहे हे सांगितल्यावर एकदाची ती तयार झाली. ती स्वारगेटला पटोळयांच्या बंगल्यावर उतरली. त्या बंगल्यातील झगमगाट बघून ती बावरली असावी असा तिचा चेहेरा सांगत होता. विकासच्या आईने तिची आस्थेने विचारपुस केली. चांगला पाहुणचार केला. पण लग्नांत आहेर म्हणून अण्णा काय देणार? कारण काही द्यावे अशी त्याची परिस्थितीच नव्हती. त्याने येताना आईने घरी बनवलेले कानवले आणले होते. ते कानवले एका टोपलीत बांधुन त्यावर रंगिबेरंगी

कागदी फुलांची माळ बांधली होती. पुर्वी खेड्यात लग्नकार्याला जाताना अशा प्रकारचे कानवले नेण्याची प्रथा होती. त्याला शहरी भागांत करंज्या म्हणतात हे पुढे अण्णाला समजले.

अण्णाच्या आईने रिक्षा हा काय प्रकार आहे हे पाहिले नव्हतं. तिने जास्तीत जास्त घोड्यांच्या गाड्या म्हणजे टांगे बघितले होते. अण्णाने तिला रिक्षात बसवून मस्तपैकी डेक्कनवरून फिरवून आणले. आपल्या मुलाबरोबर रिक्षातून फ़िरताना त्या माऊलीच्या चेहे-यावर मर्सीडीज बेंझ मधुन फ़िरल्याचा आनंद व समाधान व्यक्त होत होते. गरिबीतही सुख कसे मिळवावे हे त्या माऊलीला अचुक माहीत होते. संपत्ती पायाशी लोळण घेत असताना सुध्दा आज अनेक जण कारण नसताना उगीचच दुःखी होत असतात. त्यांच्या डोळयात हे झणझणीत अंजनच आहे.

आईची इच्छा होती म्हणून अण्णाने तिला आळंदिला नेऊन आणले. तिथे तिने गाभाऱ्यात लोटांगण घातले. तिने ज्ञानेश्वर माऊलीकडे काय मागितले हे अण्णाला कळले नाही, पण नंतर त्याला जवळ घेऊन त्याच्या कपाळाचे चुंबन घेतले. आईने आपल्यासाठी निश्चीतच काहीतरी चांगले मागितले असणार अशी अण्णाची खात्री होती. मोठ्या समाधानाने अण्णाची आई गांवी परत गेली.

एप्रीलमध्ये एम. एस्सी. ची शेवटची परिक्षा झाली. पेपर चांगले गेले होते. पास होण्याची खात्री होती. गावी जाण्याआधी अण्णा विकास पाटोळेच्या घरी गेला. त्याच्या आईवडिलांनी त्याला विचारले की आता पुढे काय करणार? ध्यानी मनी नसताना अण्णा बोलून गेला ‘मी कारखाना काढणार आहे.’ अण्णाचे हे उत्तर ऐकून ते अवाकच झाले. कारण तसेच होते. अण्णाला त्यांनी संभाळले होते. त्यांच्या घरी काम करीत कधी अण्णा त्यांच्या दुकानात उभा राही. त्यासाठी त्यांचीच सायकल वापरत असे. अशा वेळी हा मुलगा म्हणतो मी कारखाना काढणार. एक तर हा वेडा असला पाहिजे.

## हिंमते मर्दा

## सात

‘ मला कारखानदार व्हायचे आहे ‘ एम.एस्सी. मॅथेमॅटिक्स होऊ घातलेल्या अण्णाचे हे उद्गार ऐकून विकासच्या आईवडिलांना आश्चर्य वाटले नसेल तर नवलच. कारण त्यांना अण्णाची दळिद्री आर्थिक परिस्थिती चांगली ठाऊक होती. ज्याच्या खिशात गावी जाण्याएवढे बस भाड्याचे पैसेसुद्धा नसतात तो काय कारखाना काढणार असे त्यांना वाटणे साहजिकच आहे. त्यांनी तसे काही बोलून दाखवले नाही एवढेच. कालांतराने अण्णा पास झाल्यानंतर त्याने आता नोकरी करावी असा सर्व बाजुने त्याच्यावर दबाव येऊ लागला. आम्ही तुला लहानाचा मोठा केला, शिकवले, तुझा खर्च चालवला. आता तुझा खर्च तु चालव. नोकरी बघ असे त्याला घरातून सांगण्यात आले. पण यावेळी पुन्हा एकदा अण्णाची आई खंबीरपणे त्याच्या पाठिशी उभी राहिली. आईने त्याला सांगितले ‘ तु पास व्हावास म्हणून नवस बोलले होते की तुझ्या वजनाचे खोबरे व भंडारा पालिच्या ज्योतिबाला वाहीन. जमेल तेव्हा तू हा नवस फेड. मी आता फार थकले आहे. पांडुरंग जेव्हा नेईल त्या वेळी जाईन. पण पुढे काय करायचे हे तुझे तुच ठरव. ‘ त्यावेळी अण्णाची आई 80 वर्षांची होती आणि आपण आईसाठी काहीच करु शकलो नाही ही खंत त्याला होती.

इंदापुरच्या ज्युनीयर कॉलेजमधे गणिताच्या प्राध्यापकाची जागा रिकामी होती. त्यासाठी अर्ज मागवण्यात आले होते. अण्णाने ती जाहिरात वाचली व अर्ज केला. त्याचा इंटरव्ह्यु होऊन तो सिलेक्ट पण झाला व त्याला ही नोकरी मिळाली. पण अण्णाला नोकरी

करायची नव्हती. त्याने उद्योग धंद्यात पडायचा ठांम निर्णय घेतला होता. येणाऱ्या सर्व संकटांना सामोरे जायची त्याची तयारी होती. इतर मराठी माणसांससारखा ' आधी काही दिवस नोकरी करु. थोडा अनुभव मिळवू. मग सावकाश धंद्यात पडू.' असा विचार त्याच्या मनाला शिवलासुद्धा नाही. कारण अण्णाला माहीत होते की एकदा का तो नोकरीच्या खोडात अडकला तर त्यातून बाहेर पडणे कठीण असते. नोकरी हाच उद्योग व्यवसायाच्या मार्गातील मोठा अडसर असतो. त्यामुळे त्याने ती नोकरी चक्क नाकारून सर्वांवर जणु काही बॉम्बगोळाच टाकला. इतकेच नव्हे तर नोकरीचे दार स्वतःसाठी कायमचे बंद करून टाकले.

अण्णाचा मित्र हनुमंत माने त्यावेळी मिलीटरीत होता. शिक्षण अर्धवट सोडून तो मिलीटरीत भर्ती झाला होता. अण्णाचा व त्याचा ऋणानुबंध अजून कायम होता. तो सुट्टीत गावी आला होता. त्याच्याकडून थोडे पैसे उसने घेऊन अण्णा गुपचुप पुण्याला आला. फर्ग्युसन कॉलेज रोडवरील माने मॅन्शन मधे महिना 50 रुपये भाड्याची खोली घेऊन राहु लागला. कारखाना काढण्याचे स्वप्न उराशी बाळगून त्याने निरनिराळया कंपन्यात फिरायला सुरवात केली. तो अनेक लोकांशी बोलला. जागेविषयी चौकशी केली. हे करताना अण्णाची दमछाक होत होती. पाच फुट अकरा इंच उंचीचा, किरकोळ शरीरयष्टी असलेला, बिनाइस्त्रीचे कपडे आणि पायात चपला घालणारा, सायकलवरून फिरणारा एक खेडुत तरुण कारखानदार कसा होऊ शकतो? ज्याच्याकडे बिलकुल पैसे नाहीत, ज्याला चहा पाण्याची भ्रांत आहे तो कारखानदार होण्याचा विचार तरी कसा करु शकतो? मस्तपैकी नोकरी करायची तर ते सोडून हा काय भलताच वेडेपणा चालु आहे? त्यावेळी ज्यांना ज्यांना म्हणून अण्णा भेटला त्या सर्वांनी त्याला वेडा किंवा मुर्ख ठरवले असेल. अण्णा खरोखरच त्यावेळी वेडाच झाला होता. पण भविष्यकाळ त्याला खुणावत होता.

पण अण्णासारखे वेडे किंवा मुर्ख लोकच काहीतरी भरीव कामगिरी करून दाखवु शकतात. लवकरच अण्णा हे सिद्ध करून दाखवणार होता.

'हिम्मते मर्दा तो मदत दे खुदा' अशी एक म्हण आहे. जे मर्द गडी हींमत दाखवतात, देव त्यांच्या पाठिशी उभा असतो. लवकरच अण्णाला याचा प्रत्यय यायचा होता.

एका सोमवारी संध्याकाळी अण्णा विकास पटोळेच्या घरी गेला होता. अण्णाचा धंदा काढण्याचा विचार पक्का अहे का अशी विकासच्या वडिलांनी, त्यांना सगळे दादा म्हणत असत, विचारणा केली. विचार पक्का असल्याचे अण्णाने सांगितले तेव्हा त्याच्या मनात कोणता

व्यवसाय करायची इच्छा आहे असे दादांनी विचारले. त्यावेळी प्लॅस्टीक बॅग्ज व प्लॅस्टीक इंजेक्षन मोल्डींगचा व्यवसाय अण्णाच्या मनात असल्याचे त्याने सांगितले. याचे कारण देताना अण्णाने सांगितले की याला इंजिनीअरींगचे ज्ञान कमी असले तरी चालते. सामान्य ज्ञानावर आपण हा धंदा चालवु शकतो. त्यावेळी पिंपरीत राज प्लॅस्टीक इंडस्ट्रीज या नावाने एक कमी शिकलेले गृहस्थ पॉलिथीन बॅग्ज बनवण्याचा धंदा करीत होते. त्यांचा माल किर्लोस्कर ऑईल इंजीन्स व गरवारे नायलॉन्स या कंपन्यांना जात होता. अण्णाने त्यांना त्यांची मशीनरी दाखवण्याची विनंती केली पण त्यांनी अण्णाला दारातसुद्धा उभे राहु दिले नाही. पण एवढे असूनही पाटोळे दादांनी अण्णासमोर प्रस्ताव मांडला. ‘ तु आमच्या बाळुबरोबर ( विकासचा भाऊ ) धंदा सुरु कर. आम्ही तुला आमचाच समजु. निम्मे भांडवल तुझे, निम्मे आमचे. पार्टनरशीपमधे तुझ्या मनात असलेला प्लॅस्टीकचा धंदा सुरु कर.’

आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन डोळे अशी अण्णाची अवस्था झाली होती. देवासारखेच पाटोळे दादा अण्णाच्या आयुष्यात आले होते.

कारखाना काढायचा म्हणजे पहिला प्रश्न येतो तो जागेचा. त्यावेळी भोसरी-चिंचवड भागात नवीन औद्योगीक वसाहत ( M.I.D.C.) सुरु झाली होती. पण ती जागा लांब असल्यामुळे सहसा तेथे कोणी जायला तयार होत नव्हते. ती जागा सरकारी मालकीची असल्याने योग्य दरात मिळण्याची शक्यता होती. पाटोळे दादांनी संमती दिल्यावर अण्णाच्या अंगात जणु उत्साहाचे वारे संचारले. दुसऱ्या दिवशीच डेक्कनवरील अमोल सायकल मार्ट मधुन आयडेंटिटी कार्ड दाखवून सायकल भाड्याने घेतली आणि 20 किलोमीटर अंतरावर असलेल्या एम. आय. डी. सी. ऑफीसकडे धाव घेतली. तो दिवस चांगला होता. ऑफीसच्या लोकांनी लगेच अण्णाला जीपमधे बसवून साईटस दाखवल्या. त्यातील 10 हजार चौरस फुटांचा प्लॉट अण्णाला पसंत पडला. 90 पैसे चौरस फुट या दराने 9000 रुपयांमधे ती जागा उपलब्ध होती. निंम्मी रक्कम म्हणजे 4500 रुपये लगेच भरायचे होते. संध्याकाळी पुण्याला परत आल्यावर अण्णाने ही गोष्ट पाटोळे दादांच्या कानावर घातली. त्यावेळी सायकलचे भाडे द्यायला सुध्दा अण्णाकडे पैसे नव्हते. मित्राकडून पैसे उसने घेऊन सायकलचे भाडे द्यावे लागले. जागेला लागणारे 4500 रुपये प्रथम अण्णाने भरावेत. उरलेले 4500 रुपये पाटोळे दादा नंतर देतील या बोलीवर दादा तयार झाले. त्याच रात्री अण्णा पैसे आणायला म्हणून गावी पळाला. अण्णाने कारखाना काढावा ही गोष्ट घरच्यांना फारशी पसंत नव्हती. पण पाटोळे दादा मदत करणार आहेत म्हटल्यावर विरोध मावळला. घरच्यांनी होते नव्हते ते धान्य विकून पाच हजार रुपये

जमा करून अण्णाच्या हवाली केले. त्याने लगेच जागेचे 4500 रुपये भरले व उरलेले 4500 रुपये पाटोळे दादांनी भरले.

आता अण्णाची सायकल तुफान वेगाने सुटली होती. कारण बस भाड्यासाठी पैसे नसल्याने त्याला सायकलवरूनच सगळीकडे फिरावे लागत होते. त्यानंतर एक इंजेक्षन मोल्डींग व प्लॅस्टीकच्या पिशव्या बनविण्यासाठी एक्सटूडर मशीन नीवडले. एस.एस.आय. ( स्मॉल स्केल इंडस्ट्री) ची नोंदणी करून घेतली. भांडवलासाठी एम. एस. एफ. सी. ( महाराष्ट्र स्टेट फायनान्स कॉर्पोरेशन )कडे जायचे ठरले. तिथेही नशीबाने हात दिला. अण्णाचा चौधरी नावाचा मित्र तेथे होता. त्याने अण्णाला येण्याचे कारण विचारले. त्याने कारण सांगितल्यावर चौधरिने प्रॉजेक्ट रिपोर्ट बनवून दिला व त्यावर कर्ज मंजुर झाले. हे सगळे करताना अण्णा दिवसभर सायकलवर फ़िरत होता. संध्याकाळी थकून जात होता. सुशिक्षीत बेकार योजनेखाली अण्णाला महिना 250 रुपये मिळत होते. त्यावर उदर निर्वाह चालु होता. मित्राच्या घरी जेवायला मिळाले तर तेव्हडीच वेळ निभाऊन जाई. संध्याकाळी पाटोळे दादांना दिवसभरातील कामाचा तपशील सांगत असे. पण एवढे असूनही  अण्णाचा उत्साह तसुभरसुद्धा कमी झाला नव्हता.

खांडेकर नावाचे पुण्यातील एक मोठे वास्तुविशारद ( आर्किटेक्ट ) दादांचे मित्र होते. ते रोज संध्याकाळी दादांकडे पान खायला येत. त्यांनी विनामुल्य फॅक्टरीचा नकाशा काढून दिला. पाटील इस्टेटचे भास्कर पाटील यांनी इमारत बांधायची जबाबदारी घेतली. हे पण दादांचे मित्रच. एम.एस.एफ.सी च्या कर्जातून त्यांना वीस हजार रुपये दिले. सारे कसे सुरळीत चालु झाले.

पण विघ्न आले नाही तर ते अण्णाचे आयुष्य कसले? संकट आणि संधी नेहमी हातात हात घालून येत असतात. अण्णाला याचा प्रत्यय यायचा होता. सिमेंटचा प्रश्न उभा राहिला. त्या वेळी बाजारात 19 रुपये पोते या दराने सिमेंट मिळत होते तर सरकारी दर 11 रुपये पोते होते. महाग दराने सिमेंट परवडण्यासारखे नव्हते. अण्णाने कंट्रोल रेटने सिमेंट मिळावे म्हणून अर्ज केला होता. पण सचिवालयात कोणी ओळखीचे नव्हते म्हणून त्याचा अर्ज मंजुर होत नव्हता. तसा अण्णाचा स्वभाव पहिल्यापासूनच धाडसी. त्याने सरळ मुंबइला जाऊन वसंतदादा पाटलांची भेट घेतली. ते त्यावेळी महाराष्ट्र मंत्रीमंडळात पाटबंधारे मंत्री तर होतेच पण राज्याचे वरीष्ठ मंत्री पण होते. त्यांनी सचिवाला सांगून अण्णासाठी पाच हजार पोती सिमेंटचा कोटा मंजुर करून दिला. त्यामुळे फॅक्टरीचे बांधकाम वेगाने तर झालेच. पण उरलेले सिमेंट बाजारात विकून अण्णाला 50 हजार रुपये मिळाले. योग्य वेळी योग्य कामासाठी

पैसा मिळाला. तीन चार महिन्यात मशिन्स येऊन युनिट चालु झाले. फॅक्टरी सुरु करायच्या वेळी अण्णाने मुद्दामहून आपल्या आईला पुण्याला आणले होते. आपल्या मुलांचे स्वप्न साकार होते आहे हे बघून त्या माऊलीला आनंद आणि समाधान वाटले असेल.

अजूनही अण्णा आर्थिक दृष्टीने अस्थीरच होता. पण लौकरच त्याच्यावरची जबाबदारी वाढणार होती. आता घरच्यांना अण्णाच्या लग्नाचे वेध लागले होते. गेली तीन वर्षे वधू संशोधन चालु होते. मुली सांगून येत होत्या. पण सगळया धंदा करणाऱ्या मराठी तरुणांना लग्नाच्या बाबतीत जो अनुभव येतो, तोच अण्णाला पण येत होता. मुलगा धंदा करतो, नोकरी करत नाही हे कळल्यावर मग मुलींकडून नकार येणे सुरु झाले होते. जर मुलाचा धंदा बुडाला तर आपल्या मुलीवर उपाशी रहायची पाळी येईल अशी भिती मुलींच्या पालकांना वाटत असावी. इतर जमातीत उद्योग व्यवसाय करणाऱ्या घरात मुलगी देणे प्रतिष्ठेचे समजतात. पण मराठी समाजात मात्र अशा घरात मुलगी देण्याआधी शंभर वेळा विचार करण्यात येतो. त्यामुळे अण्णाचे लग्न जमत नव्हते. पण अचानक खटाव तालुक्यातील औंध या गावातील रत्नमाला यादव या बी.ए. डी. एड. झालेल्या हायस्कुल शिक्षिकेचा होकार आला आणि अण्णाचे लग्न जमले. लग्न सोहळा गावीच पार पडला. अण्णाच्या घरच्या लोकांनी भरपुर अन्नदान केले. अण्णाच्या लग्नासाठी म्हणून विकासचे आईवडील व इतर सर्वजण मुद्दामहून पुण्याहून आले होते. लग्नानंतर आपल्या नवविवाहित पत्नीला गावी ठेऊन अण्णा एकटाच पुण्याला परत आला.

पण लौकरच अण्णावर फार मोठे संकट कोसळणार होते. त्याला जबरदस्त ठेच लागणार होती.

# हिंमते मर्दा

## आठ

माणसाच्या आयुष्यात दुःख आणि सुख, निराशा आणि आशा, पराभव आणि विजय, संकटे आणि संधी हातात हात घालून येत असतात. खरे म्हणजे त्या एकाच नाण्याच्या दोन बाजु आहेत. सर्वसाधारण माणसे या नाण्यांच्या एकाच बाजुचा म्हणजे दुःख, निराशा, पराभव, संकट याचाच विचार करत बसतात. नाण्याच्या दुसऱ्या बाजुचा विचार सहसा करत नसतात. त्यामुळे त्यांची प्रगती होत नसते. पण काही थोड्या व्यक्ती अशा पण असतात की ज्या सतत या नाण्यांच्या दुसऱ्या बाजुंचा पण विचार करत असतात. अण्णा याच कॅटेगरीतला होता.

ज्याप्रमाणे दिवासानंतर रात्र व मग रात्रिनंतर दिवस हे चक्र सतत चालु असते तसेच हे पण चक्र चालु असते. दुःख झाल्यशिवाय सुखाचे महत्व कळत नाही. निराश झाल्याशिवाय आशेचा एक किरणसुद्धा किती महत्वाचा असतो हे समजत नाही. पराजय झाल्याशिवाय विजयाचा आनंद मिळत नाही. संकटे आल्याशिवाय आलेल्या संधी समजत नाहीत.

अण्णाच्या आयुष्यात सुख आणि दुःख, आशा आणि निराशा, जय आणि पराजय ही चक्रे तर जन्मापासून चालुच होती. त्यात आता अजून एका चक्राची भर पडणार होती. ते चक्र म्हणजे संकटे आणि संधी यांचे.

लग्न करून अण्णा एकटाच पुण्याला परत आला. त्याला दादा पाटोळेंनी बोलावले व सांगितले, ‘ भागीदारीत धंदा करण्यात आम्हाला इंटरेस्ट नाही. त्यामुळे आम्ही तुझ्याबरोबर केलेली पार्टनरशीप तोडत आहोत. एकतर तु तुझे भांडवल घेऊन बाहेर पड किंवा आमचे भांडवल आंम्हाला परत देऊन सगळया फॅक्टरीचा ताबा तु घे!’

दादांचे हे बोलणे ऐकून अण्णा पार हादरूनच गेला. काय झाले, कुठे माशी शिंकली त्याला काही कळेना. पाटोळे दादांच्या पाठिंब्यावरच तर अण्णाने फॅक्टरी उभारण्याचे

धाडस केले होते. त्याने मोठ्या प्रेमाने आपल्या कंपनीचे नांव ‘इलाईट प्लॅस्टीक इंडस्ट्रीज’ असे ठेवले होते. ‘इलाईट’ नांव निवडण्यामागचे कारण म्हणजे दादांचे पुण्याला डेक्कन जिमखान्यावर इलाईट ऑप्टिशीयन्स या नांवाचे चष्याचे दुकान होते. तसेच इलाईट या शब्दाचा अर्थ ‘ उच्च दर्जाचे लोक’ ( A group of Elite people ) असा पण होतो. या इलाईट मुळे आपल्या दर्जात वाढ होईल असे अण्णाला वाटत होते. आता आपल्या दर्जात वाढ होणार आहे का घट होणार आहे हे काही केल्या अण्णाला समजत नव्हते. पण भागिदारीत, काय धोके असतात हे त्याच्या लक्षात आले. महाराष्ट्रीयन माणूस दुसऱ्याबद्दल शंकेच्या नजरेने पहातो. दुसऱ्यावर विश्वास टाकण्यात कमी पडतो असे अण्णाला सतत वाटते. तसेच पार्टनरशीपमधल्या बहुतेक समस्या या पैशांमुळे येतात असे अण्णाला आढळून आले आहे. इतर समाजातील लोकांची भागिदारी वर्षानुवर्षे टिकते. पण मराठी लोकांची भागिदारी कां टीकत नाही यावर आत्मसंशोधन होणे आवश्यक आहे. त्यामुळे यापुढे कधी कोणाशी पार्टनरशीप करायची नाही असा अण्णाने निर्णय घेतला.

’काय करावे?’ अण्णापुढे यक्ष प्रश्न पडला. कारण त्या फॅक्टरीच्या उभारणीसाठी अण्णाने तुफान कष्ट घेतले होते. सायकलवरून वेड्यासारखा फिरला होता. हाडाची काडे केली होती. दादा पाटोळेंचा नुसताच पाठिंबा होता. खरी मेहेनत अण्णाचीच होती. या मेहेनतीवर पाणी सोडायचे? आपण जर यातून बाहेर पडलो तर परत कधी आपल्याला कारखानदार व्हायची संधी मिळणार नाही. एकतर आपल्याला नोकरीच्या खोडात तरी अडकावे लागेल नाहीतर गावी जाऊन शेतीच्या कामाला जुंपून घ्यावे लागेल. कारखानदार होण्याची संधी परत आपल्याला मिळणार नाही हे अण्णा पक्के ओळखुन होता. पण पाटोळयांचे पैसे परत केले तर त्यांची होणारी मदत, विशेषतः आर्थिक मदत व दादांचा मिळणारा अनुभवी सल्ला बंद होणार होता. काहिही झाले तरी नुकसान हे होणारच होते. भागीदारी तोडण्याचे कारण अण्णाला आजतागाईत मिळाले नाही.

पाटोळे दादांचे पैसे परत करून फॅक्टरीचा ताबा घ्यायचा धाडसी निर्णय अण्णाने घेतला. अण्णाच्या खिशात पैसे नाहीत हे पाटेळे दादांना चांगले माहीत होते. तसेच अण्णाचे सर्व नातेवाईक गरीब आहेत. ते अण्णाला काहिही आर्थिक मदत करु शकणार नाहीत याची पण त्यांना पुर्ण कल्पना होती. त्यामुळे अण्णाने प्रॉमीसरी नोटेच्या सहय्याने पाटोळयांचे भांडवलाचे 9500 रुपये देऊन टाकले व अण्णा इलाईट प्लॅस्टीक इंडस्ट्रिचा मालक झाला. पण कसा

मालक? तर एक दमडी, खिशात नसलेला मालक! प्रॉमीसरी नोटेमुळे अण्णाला पाटोळयांचे पैसे परत करायला मुदत मिळाली हे अण्णाचे नशीबच.

अजिबात पोहता येत नसताना ज्या नावेत बसून आपण पाण्यात उतरतो, ती नाव अचानक बुडाली तर पाण्यात गटांगळया खायची पाळी येते काहिशी तशीच अवस्था अण्णाची झाली होती. जीवनाच्या एका वेगळया टप्प्यावर आता अण्णा उभा होता. आत्तापर्यंतचे सर्व निर्णय पाटोळे दादांच्या सल्याने घेण्याची सवय लागली होती. इमारत बांधताना त्यांच्याच ओळखी उपयोगी पडल्या होत्या. त्यांची मदत आहे या आत्मविश्वासावर धंदा सुरु केला होता. आता स्वतःचे निर्णय स्वतः घेण्याची पाळी आली होती. आता मार्गदर्शन करायला कोणी नव्हते. इतर अनेक समस्या होत्या.

खरे म्हणजे धंदा कसा करतात याची अण्णाला काहीच कल्पना नव्हती. त्यावेळी पाच हजार रुपये कॅश क्रेडीट सुविधा होती. ते पण पैसे उचलले होते. त्यामुळे पैशांचा प्रश्न होता. बँकेमधे पत नसल्याने बँक मॅनेजर 100 रुपयांचा चेकसुद्धा अंगावर फेकत. अण्णा अपमानाने पूर्ण खचून जायचा. काम कोठून आणायचे याची अंधुकशी कल्पना नव्हती. प्लॅस्टीक मोल्डींग कारायचे म्हणजे त्याचे मोल्ड कशा प्रकारचे असतात हे माहीत नव्हते. प्लॅस्टीकचा कच्चा माल कसा असतो याची पण कल्पना नव्हती. थोडक्यात सगळा आनंदी आनंद होता. अशा परिस्थितीत धंदा यशस्वी करून दाखवण्याची जबाबदारी अण्णावर येऊन पडली.

पण अण्णावर याहिपेक्षा मोठी जबाबदारी येऊन पडली होती. ती म्हणजे स्वतःचा संसार सुरु करण्याची! अण्णा लग्नानंतर आपल्या नवविवाहीत पत्नीला आपल्या गावी सोडून आला होता. आता तिला पुण्याला आणणे आवश्यक होते. संसार मांडायचा तर वेगळी जागा हवी. त्यासाठी भाड्याचे का होइना वेगळे घर घ्यायला हवे. अण्णाकडे तर पैशांचा खडखडाट होता. भाड्याने वेगळी जागा घ्यायला पैसे नव्हते. मग त्याने फॅक्टरीतच संसार मांडायचे ठरवले. हा पण निर्णय फार धाडसी होता. करण फॅक्टरीची जागा अगदी भोसरीपासून लांब होती. जवळपास मनुष्य वस्ती नाही. साधी काड्याची पेटी आणायची म्हटली तरी लांब जावे लागे. फॅक्टरी जवळ जवळ जंगलातच. आजुबाजुला मोकळे माळरान. तेथे झाडे झुडपे व गवत वाढलेले. दिवसा तेथे गुराखी गुरे चारायला आणत असत. साप विंचु निघत. पण अण्णाला रत्नमाला वहिनींची भक्कम साथ मिळाली होती. त्या तिथे रहायला आनंदाने तयार झाल्या. फक्त तीन भांड्यांवर संसाराला सुरवात झाली. अण्णा बाहेरच्या काटक्या गोळा करून आणत असे. मग त्यावर चुल पेटवून भात शीजत असे. अण्णाला याचे

फार वाईट वाटत असे. पण आता तो चक्रव्हुहात अडकला होता. यातून बाहेर पडण्याचा मार्ग सापडत नव्हता.

अण्णाने खुप विचार केला. आपणच निर्माण केलेले हे अवघड गणित आपणच सोडवायचे असा त्याने निर्धार केला. अण्णाला त्याच्या चुका स्पष्ट दिसु लागल्या. आपण जेव्हा दुसऱ्याकडे जातो तेव्हा आपली भाषा चांगली पाहिजे. आपल्या बोलण्यातून आपला आत्मविश्वास व धंद्याविषयीचे ज्ञान दिसले पाहिजे. इतरांवर छाप पडेल असे काहीतरी गुण आपल्यात पाहिजेत याची अण्णाला पावलो पावली जाणीव होत होती. आत्ता तरी या बाबतीत अण्णा फार मागे होता. या गोष्टी त्याला कोठे विकत मिळणार नव्हत्या. आत्तासारख्या त्या वेळी व्यक्तीमत्व विकास संस्था नव्हत्या. तसेंच एम.बी.ए. सारख्या शिक्षण संस्था नव्हत्या. हे अण्णाला आपले आपणच उभे करावे लागणार होते. जे आपल्याकडे नाही ते परिश्रमपुर्वक उभे करायचे त्याने ठरवले. तसेच चांगल्या लोकांचे अवलोकन केल्याने आपल्यात सुधारणा होऊ शकते याची अण्णाला जाणीव झाली. त्यासाठी चांगल्या मित्रांची संपदा गोळा करण्याचे ठरवले.

कितिही संकटे आली तरी इलाईट प्लॅस्टीक इंडस्ट्री चालवायचीच असा अण्णाने पक्का निर्धार केला. आपण आपल्या पद्धतीने कामे आखू. आपल्या वागण्या बोलणातल्या चुका सुधारु असे ठरवून तो कामाला लागला. त्याचे आत्मबळ जबर होते. ज्या प्रकारचा उद्योग करण्याची इच्छा कॉलेज जीवनापासून अण्णाच्या मनात होती तो उद्योग साकार होत चालला होता. आत्तापर्यंतच्या वाटचालीत निरनिराळया शक्तींनी हातभार लावला होता. घरच्यांची साथ वेळोवेळी मिळत गेली. भागीदारी जरी तुटली तरी पाटोळे दादांनी अगदी योग्य वेळी मदतीचा हात पुढे केला. आपल्याला मोठे कारखानदार जरी होता आले नाही तरी यशस्वी लघुद्योजक व्हायची अण्णाची इच्छा होती. कारण लघु उद्योजकच मोठ्या उद्योगाचा कणा असतो हे त्याने बरोबर ओळखले होते. जर लघु उद्योगाने मोठ्या उद्योगाला माफक किंमतीत माल बनवून दिला नाही तर मोठा उद्योग गिऱ्हाइकाला योग्य दरात माल विकू शकणार नाही हे अण्णाला समजून आले होते.

अण्णाची मुख्य अडचण काम मिळविणे ही होती. कारण काम नसल्यामुळे फॅक्टरी बंद होती. आता अण्णाचे त्या दृष्टीने प्रयत्न सुरु झाले होते. बिझिनेसचा पाया तर घालून झाला होता. आता त्यावर इमारत बांधायची जबाबदारी अण्णाची होती. यात तो कितपत यशस्वी होईल हे काळच ठरवणार होता.

# हिंमते मर्दा

## नऊ

कुठलाही धंदा म्हटला की त्याचा सुरवातीचा काळ फार कठीण असतो. या काळात अनेक भले बुरे अनुभव येत असतात. यात बुरे अनुभव जास्त तर भले अनुभव कमीच असतात. हा असा काळ असतो की धंद्यात तुम्ही नवीन असता. तुम्हाला फसविणारे, टोप्या घालणारे, लबाडीचा व्यवहार करणारे, तुम्हाला नामोहरम करायला बघणारे, वारंवार तुमच्यातील चुका दाखवून तुमचा आत्मविश्वास खच्ची करणारे लोक याच काळात भेटत असतात. तसेच तुम्हाला मदत करणारे चांगले लोक पण याच काळात भेटत असतात. पण चांगले कोण आहेत व वाईट कोण आहेत याची पारख करणे या काळात कठीण जात असते. ज्यांच्यावर भरवसा ठेवावा तर तेसुद्धा केसाने गळा कापणारे निघत असतात. आपले शत्रु कोण आहेत, मित्र कोण आहेत, हितचिंतक कोण आहेत, द्वेष करणारे कोण आहेत हे अजिबात समजत नसते. यातूनच टक्के टोणपे खात, ठेचा खात, चुका करत आपण शिकत जात असतो. प्रत्येकालाच यातून जावे लागते. अण्णाला पण आता या चक्रातून जावे लागणार होते.

मुंबई हे भारतातील प्लॅस्टीकचे माहेरघर म्हणून समजले जाते. पुणे जरी मुंबईपासून फारसे लांब नसले तरी तेथे प्लॅस्टीक उद्योग अजूनही बाल्याव्यस्थेत होता. अगदी मोजके लोक या धंद्यात होते. मालाला फारसा उठाव नव्हता. त्यातून मोल्डींग प्लॅस्टीकचा वापर औद्योगिक कारणासाठी फारच मर्यादित प्रमाणात होत असे. त्यामुळे अण्णाने सुरवातीला पॉलिथीन बॅग्ज बनविण्याचे ठरवले. पॅकींगसाठी तसेच साठवणीसाठी या बॅग्जचा उपयोग

होतो. अशा प्रकारच्या पॉलिथीन बॅग्ज बनविणारी दोन तीन युनीट्स पुण्यात होती. त्यांचा माल कोणकोणत्या कंपन्यांना पुरवला जातो हे अण्णाने शोधुन काढले. त्या कंपन्यांमधे जाऊन अण्णाने ऑर्डर मिळवण्याच्या प्रयत्नांना सुरवात केली. पण प्रत्येक ठिकाणी तो मार खाऊन परत येत असे. आपल्या जुन्या सप्लायर्सना सोडून अण्णाला काम द्यायला कोणी तयार होत नसे. याचे कारण म्हणजे अण्णाची बावळट पर्सनॅलिटी. बिना इस्त्रिचे कपडे घालणारा, पायात चपला घालून सायकलवरून येणारा, सामान्य व्यक्तीमत्व असलेला, ज्याला धड बोलतासुद्धा येत नाही, ज्याला सिगारेट तंबाखु किंवा पान खाण्याचेसुद्धा व्यसन नाही असा अण्णासारखा माणूस एखाद्या फॅक्टरीचा मालक असू शकतो यावर विश्वास ठेवायलाच कोणी तयार होत नव्हते. अण्णा एका खोलीत रहात होता. आत 5000 स्केअर फुटांची इमारत. रात्रीच्या वेळी भयाण वाटायचे. काळजीने जागून रात्र काढावी लागत असे.

निरनिराळया कंपन्यात फिरूनही काम मिळेना तेव्हा अण्णाने आपला मोर्चा ट्रेडर्सकडे म्हणजे व्यापाऱ्यांकडे वळवला. सायकलवरून अण्णा पुण्यात ठीकठिकाणी फिरला व चौकशी केली. शेवटी एक मारवाडी व्यापारी पॉलीथीन बॅग्ज घेण्यास तयार झाला. अण्णाने निरनिराळया आकाराच्या पिशव्यांचे दर ठरवले, बँकेत जे लिमीट शिल्लक होते त्यातून पैसे उचलले व कच्चा माल आणायला मुंबईला गेला. कारण त्या वेळी प्लॅस्टीकच्या सर्व मालाची खरेदी अण्णा मुंबईहून करत असे. तेथुन कच्चा माल आणून अण्णाने पिशव्या बनवल्या. सर्व माल तपासून ठीक आहे की नाही याची खात्री करून घेतली. मग रिक्षात माल टाकून अण्णा त्या मारवाडी व्यापाऱ्याकडे माल पोचवायला गेला. त्यावेळी त्या रिक्षाला देण्यासाठीसुद्धा पैसे त्याच्या खिशात नव्हते. माल मिळाल्यावर लगेच पैसे देईन असे त्या व्यापाऱ्याने सांगितले होते. त्यामुळे माल दिल्यावर पैसे मिळतील व त्यातून रिक्षावल्याचे पैसे देता येतील असा साधा हिशोब अण्णाच्या डोक्यात होता.

पण ऐनवेळी त्या मारवाडी व्यापाऱ्याने अण्णाला टांग मारली. प्लॅस्टीकचा गेज बरोबर नाही, मालाची क्वालिटी चांगली नाही अशी कारणे सांगत माल घ्यायला नकार दिला. त्यामुळे अण्णा पार हादरूनच गेला. बाहेर रिक्षा उभी ठेवली होती. त्याचे पैसे कसे द्यायचे हा पेच अण्णापुढे उभा राहिला. मग मोठ्या मिनतवारीने अण्णाने ज्या किंमतीत कच्चा माल आणला होता त्या किंमतीत त्या व्यापाऱ्याने एकदाचा तो माल घेतला. एकूण काय तर या

सगळया व्यवहारात खोटच आली. सगळा आतबट्ट्याचा व्यवहार झाला. फायदा होण्याऐवजी नुकसानच झाले. घेतलेले कष्ट वाया गेले. नंतर अण्णाने अजून एके ठिकाणी असाच प्रयोग करून बघितला. तेथे पण असाच अनुभव आला.

याचे कारण होते अण्णाची आर्थिक निरक्षरता. आर्थिक व्यवहार नीट समजाऊन न घेण्याची टिपीकल मराठी माणसाची प्रवृत्ती! त्यात भर म्हणजे अण्णाचे किरकोळ व्यक्तीमत्व. मराठी माणूस आर्थिक बाबतीत सहज फसवला जातो. अण्णाच्या बाबतीतही तेच झाले होते. अण्णाने जर त्या व्यापाऱ्याकडून थोडा ऍडव्हान्स घेतला असता तर त्याला फसवण्याचे धाडस त्या व्यापाऱ्याला झाले नसते. पण अण्णाने ते केले नाही व शेवटी तो फसला.

बँकेकडून मिळणारे भांडवल संपले होते. हातात एक पैसाही नव्हता. घरात धान्य पण नव्हते. त्यातच अण्णाला पहिले कन्यारत्न झाले, जबाबदारी आणखी वाढली. एवढी मोठी इमारत. आंत मशीनरी. दोन कामगार. अशा स्थितीत कंपनीतच वास्तव्य करून अण्णाला मालक आणि वॉचमन अशी दुहेरी भुमिका वाठवावी लागत होती. संध्याकाळी तो सर्व परीसर भयाण वाटे.

फक्त मराठी माणासाकडूनच नव्हे, तर महाराष्ट्र राज्याच्या मराठी सरकार कडूनसुद्धा उद्योग व्यवसाय करणाऱ्या मराठी माणसाचे कंबरडे कसे मोडले जाते याचा पण अनुभव अण्णाला आला.

पुण्याच्या दैनिक सकाळ मधे MSSIDCला पॉलीबॅग पुरविण्याच्या टेंडरची माहिती आली होती. माल बऱ्यापैकी पुरवायचा होता. तो माल शेतकी खात्याला जाणार होता. शिवाय माल पोचल्यावर लगेच पैसे मिळणार होते. अण्णाने ते टेंडर भरले. दर कमी असल्यामुळे त्याला ते टेन्डर मिळालेसुद्धा. बँकेत पैसे नव्हते. त्यांना ती ऑर्डर दाखवून पैसे देण्याची विनंती केली. त्यावेळी रामशास्त्री बाण्याचे एक निस्पृह, कर्तव्यदक्ष, मराठी अभिमानी असे एक मराठी ब्राम्हण गृहस्थ बँकेचे मॅनेजर होते. अण्णाने आधीचे हप्ते वेळेवर फेडलेले नसल्याने आधीच त्याचे नांव कानफाट्या पडले होते. त्या मॅनेजरने रामशास्त्री बाण्याने अण्णाच्या तोंडावर बँकेचे नियम फेकून व कर्ज नाकारून आपण आपल्या कर्तव्यात किती चोख आहोत हे दाखविण्याची संधी सोडली नाही. पण अण्णाच्या जागी जर एखादा मारवाडी,

गुजराती, पंजाबी, सिंधी किंवा साऊथ इंडीयन व्यापारी असता तर त्यांना हे धाडस झाले नसते. कारण त्यांना ठाऊक होते की या लोकांचे वरपर्यंत लागेबंधे असतात. आपण कर्ज नाकारले तर ते वरून दबाव आणून कर्ज मंजुर करून घेतील. नाहीतर आपली नोकरी धोक्यात आणायला हे लोक कमी करणार नाहीत. मराठी माणसांचे सर्व नियम हे फक्त मराठी माणसांसाठीच असतात. इतरांसाठी नसतात. अण्णाने मग पुष्कळ अर्ज विनंत्या केल्यावर त्या मॅनेजर साहेबांनी रागाने पाच हजार रुपये कर्ज एकदाचे मंजुर केले. पण यात पुष्कळ वेळ गेला.

त्यामुळे अण्णाला वेळेवर पिशव्या बनवून देता आल्या नाहीत. सप्लाय करायला उशीर झाला. याचा परिणाम असा झाला की अण्णाला सप्लाय केलेल्या मालाचे पैसे तर मिळाले नाहीतच, उलट माल उशिरा दिल्याबद्दल त्याला दंड करण्यात आला. इतकेच नव्हे तर त्यांच्या ठरलेल्या माणसाकडून टेंडर न काढताच चढ्या दराने तेच काम करून घेतले. हे पाहून तर अण्णा कोसळलाच. नोकरीच्या फंदात न पडता उद्योग व्यवसाय सुरु करण्याचा जो गुन्हा अण्णाने केला होता त्याबद्दल महाराष्ट्र राज्याच्या मराठी सरकारच्या मराठी खात्याकडूनच अण्णाच्या सणसणीत मुस्कटात मारण्यात आली. कारण उद्योग व्यवसाय करणाऱ्या मराठी माणसाचे कंबरडे सरळ रहाता कामा नये म्हणून.

परंतु वाइटातूनही काही चांगले पण निघत असते. काही योगायोग असे असतात की त्या ठिकाणी तर्कशास्त्रसुद्धा फिके पडते. धडपड करणाऱ्या माणसाच्या पाठिशी देव नेहमी उभा असतो याची प्रचिती येऊ लगते. 1977 साली अण्णाच्या घरी टेलिफोन आला. फोन आला त्या दिवशी अण्णाच्या घरचे सगळे आनंदात होते. टेलिफोन डिपार्टमेन्टचे लोक घरी येऊन फोनचा सेट बसवून गेले. अजून फोनचा नंबर कळायचा होता. टेलिफोन एक्सचेंजमधुन फोनवर नंबर कळवण्यात येणार होता. अण्णा बाहेर गेला होता. अचानक फोनची घंटी वाजली म्हणून रत्नमाला वहिनींनी फोन उचलला. त्यांना वाटले की नंबर कळवण्यासाठी टेलिफोन एक्सचेंजमधुन फोन आला असेल. तो रॉंग नंबर होता पण अण्णासाठी तो योग्य नंबर ठरला. कारण फोनवर फिलिप्स कंपनीचे असिस्टंट पर्सनल मॅनेजर श्री. केकडे बोलत होते. त्यांनी हा फोन कुणाचा आहे म्हणून विचारले तेव्हा रत्नमाला वहिनींनी ‘ इलाईट प्लॅस्टीक इंडस्ट्रीजचा आहे’ म्हणून सांगितले. प्लॅस्टीक इंडस्ट्री म्हटल्यावर त्यांनी जरा जास्त बारकाइने चौकशी केली.

कारण त्यांच्या कंपनीला प्लॅस्टीक मोल्डींगचे काम बाहेर द्यायचे होते. त्यांनी मालक कोण आहेत म्हणून चौकशी केली व मालकांना उद्या लोणी काळभोरला पाठवून द्या म्हणून सांगितले.

कामाच्या प्रतिक्षेत असलेल्या अण्णाला ही सुवर्णसंधीच वाटली. दुसऱ्या दिवशी अण्णा लोणी काळभोरला जाऊन श्री. केकडेंना भेटला. त्यांना सर्व परिस्थिती समाजाऊन सांगितली. त्यांनी स्वतः भोसरीला येऊन अण्णाच्या फॅक्टरीला भेट देऊन तेथील मशीनरी बघितली. चांगल्या दर्जाची मशीनरी नव्हती पण त्यात थोडा बदल करून अखेर फिलिप्स कंपनीचे प्लॅस्टीक मोल्डींगचे काम थोड्या फार प्रयत्नांनी सुरु झाले. रेडियोची वेगवेगळी बटणे बनवण्याचे ते काम होते. त्यांच्या कामांत दर्जाला म्हणजे क्वालिटिला फार महत्व होते. थोडीसुद्धा तडजोड चालत नसे. अगदी लहानसा ओरखडासुद्धा चालत नसे. त्यामुळे नाइलाजाने का होइना पण प्रत्येक बटण चांगलेच निघेल याची काळजी घ्यावी लागे. दर्जा कसा टिकवायचा याचे प्रशिक्षणच अण्णाला या कामाच्या निमित्ताने मिळाले, जे त्याला पुढे फार उपयोगी पडले. फिलिप्स कंपनीचे लोक येऊन प्रत्येक बटण बारकाइने निरखुन बघत. मशिनरीवर लक्ष ठेवत. तसेच काही तांत्रिक अडचणी आल्यास त्या सोडविण्यास मदत करत. फिलिप्समुळे काम तर मिळाले. पैसेही मिळाले. पण त्याहीपेक्षा आपण उच्च दर्जाचा माल बनवु शकतो हा आत्मविश्वास अण्णात आला. पुढच्या यशाचा पाया तिथेच घातला गेला. बाजारात दर्जाच्या बाबतीत अण्णाच्या कंपनीची पत निर्माण झाली.

# हिंमते मर्दा

## दहा

फिलिप्स कंपनीच्या कामामुळे जरी अण्णाची फॅक्टरी सुरु झाली असली तरी अजूनही तो बराच रॉ होता. अजूनही त्याला बरेच टक्के टोणपे खायचे होते. अजून बऱ्याच ठेचा बसायच्या होत्या. पण यातूनच अण्णाला प्रगतीचा भक्कम मार्ग सापडणार होता.

1978 सालची घटना आहे. भोसरीच्या एम.आय.डी.सी.त स्क्रॅप न्यायला काही भंगारवाले येत. त्यातला एक भय्या अण्णाकडे स्क्रॅप नेण्यासाठी म्हणून आला. अण्णाकडे स्क्रॅप नाही हे बघितल्यावर खरी परिस्थिती काय आहे हे त्याच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. तो अण्णाला म्हणाला, ' साहेब! मुंबईला फार स्वस्तात माल मिळतो. तुमचा फार फायदा होईल! विदेशी माल असतो. माझ्या ओळखीचे एक एक्साईज इन्स्पेक्टर आहेत. ते कस्टम हाऊस मधुन माल काढून देतात. ते सांगली साताऱ्याकडचे आहेत. वसंतदादा पाटलांच्या जवळचे आहेत.' अण्णाचा त्याच्यावर थोडा विश्वास बसला. त्याने ही गोष्ट रत्नमाला वहिनींना सांगितली तर त्यांनी अण्णाला याच्यावर विश्वास ठेऊ नका. तो तुम्हाला अडकवेल असे सांगितले. पण अण्णाला जादा मिळणाऱ्या पैशांचा मोह पडला होता. गरिबीतल्या गटांगळया थांबतील असे वाटत होते. ठरलेल्या दिवशी अण्णा व्ही. टी. ( आत्ताचे सी.एस.टी.) स्टेशनवर उतरला. तो भय्या त्याची वाट बघत उभा होताच. त्याने अण्णाला वरच्या मजल्यावर स्टाफचे कॅन्टीन आहे तेथे नेऊन बसवले. मुंबईत चाकु मारतात, लुबाडतात हे अण्णा ऐकून होता. त्यामुळे तो थोडासा घाबरलेला होता. एवढ्यात टाय लावलेला एक रुबाबदार गृहस्थ त्याच्या पुढे येऊन बसला. त्या माणसाची पर्सनॅलिटी एवढी रुबाबदार होती की तो माणूस फार मोठ्या पोस्टवर असेल असे कोणालाही वाटले असते. त्याची पर्सनॅलिटी बघून तर अण्णा भारावूनच गेला. त्या माणसाने मस्तपैकी रुबाबात चहा सांगितला आणि सरळ विषयाला हात घातला.

त्याने विदेशातून आलेला माल कशा प्रकारे बाहेर काढतो हे अण्णाला सांगितले. निम्या दरात हा माल विकता येईल, यात भरपुर नफा होईल तो आपण निम्मा निम्मा वाटून घेऊ असे सांगितले. भय्या पण हे सगळे ऐकत होता. माल बाहेर काढण्यासाठी वॉचमनला पैसे द्यावे लागतात म्हणून त्याने अण्णाकडे पाच हजार रुपयांची मागणी केली. उद्या सकाळी अमुक अमुक नंबरची गाडी माल घेऊन तुमच्याकडे येईल तो माल उतरवून घ्या. माझे वडील वसंतदादांचे जानी दोस्त असल्यामुळे हे सगळे घडते आहे असेही तो म्हणाला.

अण्णाकडे पाच हजार रुपये होते. अण्णाची पुण्याला एकाशी ओळख झाली होती. एखादा चांगला धंदा असला तर मला सुचवा मी त्यात पैसे टाकीन असे त्या मित्राने सांगितले होते. हाच धागा पकडून व त्याची खात्री पटवून अण्णाने त्याच्याकडून पैसे आणले होते. अण्णाने ते पैसे त्या माणसाला देऊन टाकले व तो आनंदाने पुण्याला आला. त्याने आल्या आल्या सौ. ना सांगितले की उद्या सकाळी अमुक अमुक नंबरची गाडी माल घेऊन येणार आहे. अण्णा रात्रभर येणाऱ्या पैशांचे काय करायचे अशी स्वप्ने रंगवत होता. पण ती गाडी काही आली नाही. सौ. म्हणाल्या की मी सांगत होते की असे काही होणार नाही. गाडी काही येणार नाही. पण तुम्ही माझे ऐकले नाही.

एकूणच काय. तर कोणीतरी अण्णाला चांगलीच टोपी घातली. आणखी पाच हजार रुपयांच्या कर्जाचा बोजा अंगावर पडला तो वेगळाच. आपण फसवले गेलो आहोत ही गोष्ट अण्णाला काही फारशी रुचली नाही. मग त्याने पुन्हा मुंबईला जाऊन फलटन रोड पोलीस स्टेशनवर रीतसर तक्रार नोंदवली. बुवा नांवाचे एक इन्स्पेक्टर अण्णाला भेटले. त्यांनी पहिल्यांदा अण्णावरच उलट सुलट प्राश्नांचा मारा करून त्याला घाबरवून सोडले. पण अण्णा साताऱ्याचा आहे म्हटल्यावर त्यांचा नूर पालटला. त्यांनी अण्णासाठी चहा मागवला. कारण ते सोलापुरचे होते. त्यांनी अण्णाच्या हातात गुन्हेगारांचे फोटो असलेली फाईल ठेवली. अण्णाने आपल्याला फसवणाऱ्या त्या रुबाबदार व्यक्तिला तबडतोब ओळखले. ‘ अरे हा तर पाटील.’ इन्स्पेक्टर म्हणाले. त्यांनी अण्णाला थांबायला सांगून लगेच जीप काढून बाहेर पडले व दीड एक तासाने पाटीलला घेऊनच परत आले व त्याला लॉकअप मधे टाकले. अण्णाने पाटीलला बरोबर ओळखले. ओळख परेडमधे पण त्याला ओळखले. पण पाटीलसारखे लोक फार पोचलेले असतात. त्यांचे ठरलेले वकील असतात, ठरलेले जामीनदार तसेच साक्षिदार असतात. पाटील लगेच जामिनीवर सुटला. जाताना तो अण्णाला म्हणाला, ‘ आमचे हे रोजचेच आहे. मी नेहमीच आतबाहेर असतो.’ थोडक्यात लोकांना फसवून लुबाडणे हा पाटीलचा धंदाच होता. त्यासाठी

तो आपल्या रुबाबदार पर्सनॅलिटिचा दुरुपयोग करत होता. एक दिवस पाटीलची बायको अण्णाला भेटायला पुण्याला आली. तिने बरोबर एक हजार रुपये व पेढे आणले होते. पाटीलवरील खटला काढून घ्या म्हणून विनवणी करायला ती आली होती. तुम्ही मला तुमची बहीण समजा. मी त्यांना अशा प्रकारचे धंदे करु नका असे वारंवार सांगत असते. पण ते ऐकत नाहीत असे तिने सांगितले. आपण पालिका रुग्णालयात नर्स असल्याचे तिने सांगितले. आपला नवरा चुकीची कामे करतो त्यामुळे आपल्याला मनःस्ताप होतो असे ती सांगू लागली.

लहानपणापासून अण्णा सहृदयी! त्याला डावपेंच माहीत नाहीत. खटला काढून घेण्याआधी अण्णा पाटीलच्या लोअर परळच्या घरी जाऊन आला. त्यावेळी त्याला अजिबात भिती वाटली नाही. एखाद्या गर्भ श्रीमंताला पण लाज वाटेल अशा थाटात पाटीलचे घर सजवले होते. या पाटीलने आणखी किती जणांना टोप्या घातल्या असतील, किती जणांना उल्लु बनवले असेल, भय्यासारखे अजून त्याचे किती एजन्ट असतील देवालाच ठाऊक!

असाच अजून एक वेगळा अनुभव काही दिवसांनी अण्णाला आला. आर.जी. जाधव नांवाचे एक गृहस्थ अण्णाला भेटायला आले. ते गृहस्थ सेल्समन होते व कसलेतरी केमिकल विकायला म्हणून अण्णाकडे आले होते. त्या वेळी अण्णा जरा वैतागलेलाच होता. माझे युनिट बंद आहे असे अण्णाने त्यांना सांगितले. फॅक्टरी बंद का आहे अशी त्यांनी चौकशी केली. मझ्याकडे काम नाही, पैसा नाही, मी चक्रव्युहात अडकलो आहे, कर्ज काही माझा पिच्छा सोडत नाही, पळून जावेसे वाटते अशी बडबड वैतागापोटी अण्णाने केली. जाधव हे विक्रेते असल्यामुळे त्यांना ठीकठिकाणी हिंडून माणसांची चांगली पारख झाली होती. त्यांनी ओळखले की अण्णा अडचणीत आहे. त्याचवेळी त्यांनी मनातल्या मनात अण्णाचा बकरा करायचा म्हणून ठरवून टाकले असावे. ते दोन तास अण्णाजवळ बसले. सगळा कारखाना आतून बाहेरून बघितला. परत येतो म्हणून निघून गेले. दुसऱ्या दिवशी परत आले. मी पैशांचा बंदोबस्त करु शकतो. मी तुम्हाला भरपुर काम आणून देईन. तुम्ही मस्तपैकी बसून रहायच. दोघांनी घातलेल्या पैशांवर धंदा करु. असे सांगून अण्णाला भविष्यातील मधाची बोटे दाखवून ते निघून गेले. त्यानंतरच्या गुरवारी खरी गंमत आली. एम. आय. डी.सी.त गुरुवारी सुट्टी असते. त्यामुळे शुकशुकाट होता. वहिनी भाजी आणायला बाजरात गेल्या होत्या. संध्याकाळची वेळ होती. अण्णा एकटाच फॅक्टरीच्या दारात बसला होता. त्यावेळी नीटनेटके कपडे घातलेली एक महिला आली व ‘अहो पाहुणे, आमच्या रम्याची फॅक्टरी कुठे आहे.?’ असे विचारु लागली. तिच्याजवळच्या पत्याचे कार्ड तिने दाखवले. सत्यनारायणाच्या पुजेची ती पत्रिका होती. त्यावर जाधवचे नांव व इलाईट

प्लॅस्टीक इंडस्ट्रिचा पत्ता होता. पुजेची वेळ छापली होती. अण्णा तर अवाकच झाला. हे काय चाललय हे त्याला काही कळेना.  तेव्हड्यात बसमधुन जाधवांचे नातेवाईक आले. थोड्या वेळाने एक गाडी आली. त्यातून जाधवचे भाऊ, भावजय, बायको व मुले उतरली. अण्णा पार गोंधळून गेला. अनाहुतपणे एक माणूस माझ्या फॅक्टरीत पुजा करण्याचा प्रयत्न करतो म्हणजे कहर झाला असे अण्णाला वाटले व त्याला जाधवचा राग पण आला. आयत्या बिळात नागोबा बनण्याची जाधवाची चाल अण्णाच्या बरोबर लक्षात आली. मान ना मान मै तेरा मेहेमान असाच काहिसा हा प्रकार होता. एका पैशाचीसुद्धा गुंतवणुक न करता अण्णाची फॅक्टरी आपलीच असल्याचा देखावा जाधवला करायचा होता. अण्णाच्या हे लक्षात आले.

एकाच गोष्टीचे अण्णाला वाईट वाटत होते की एक मराठी माणूस दुसऱ्या मराठी माणसाबरोबर एवढा नीचपणा कसा करु शकतो. अण्णाने त्या सगळयांना आत बोलावले. तेवढ्यात वहिनी पण बाजारातून परत आल्या. अण्णाने सगळयांसाठी चहा ठेवायला सांगितला. मग अण्णाने सगळयांना समजाऊन सांगितले की तो या फॅक्टरीचा एकमेव मालक आहे. तुमच्या रम्याचा या फॅक्टरीशी काहिही संबंध नाही. तसेच कोणत्याही प्रकारच्या पुजेचे आयोजन केलेले नसून त्याने कोणालाही पुजेचे आमंत्रण दिलेले नाही. आपले पितळ आता उघडे पडणार म्हणून जाधव घाबरले व म्हणु लागले, ' आपण नाही का बोललो की पुजा घालु, देवाच्या कृपेने सगळे व्यवस्थित होईल म्हणून?' पुजेचा कार्यक्रम बारगळल्याने व त्यांचे पितळ उघडे पडल्याने जाधवला त्यांचा अपमान झाल्यासारखे वाटत होते. शेवटी अण्णाला ' तुला बघून घेईन ' असा दम देऊन ती मंडळी निघून गेली. त्यानंतर ते जाधव कधी अण्णाकडे फ़िरकले नाहीत.

## हिंमते मर्दा

## अकरा

पहिल्यापासूनच अण्णाचा स्वभाव धाडसी व जिद्दी होता. त्यामुळे अनेक वेळा धडपडून, मार खाऊन, पराभूत होऊनही तो जिद्दीने पुन्हा उभा रहात होता. एखादा पहेलवान किंवा बॉक्सर मार खाऊन खाऊन जसा तयार होत असतो काहिशी तशीच अवस्था अण्णाची होती. पण अण्णाचा हा जिद्दी स्वभाव त्याच्या व्यक्तीमत्वात दिसत नव्हता. अण्णाचे व्यक्तीमत्व साधे सरळ मराठमोळे होते. आपल्या व्यक्तीमत्वात बदल करण्याची गरज त्याला कधी वाटली नाही. अण्णाने अनेक थोरा मोठ्यांची चरित्रे वाचली होती. अनेक यशस्वी उद्योगपतींच्या चरित्राचा अभ्यास केला होता. यातील काही उद्योगपतींशी पुढे अण्णाचा संबंध पण आला. त्यावेळी हे उद्योगपती प्रत्यक्षात किती साधे, निगर्वी व माणूसकी जपणारे असतात याचा अनुभव अण्णाने घेतला होता. शेठ वालचंद हिराचंद सारखे ज्येष्ठ उद्योगपतीसुद्धा स्वतःच्या शर्टाची तुटलेली बटणे स्वतःच्या हाताने लावतात असे लहानपणी अण्णाचे वडील बंधु तात्या त्याला सांगत असत. यश आणि संपत्ती पायाशी लोळण घेत असतानासुद्धा जे लोक कमालीचे निगर्वी, सामान्य असतात. सामान्य लोकांसारखे व्यवहार करत असतात ते खऱ्या अर्थाने थोर किंवा ग्रेट असतात असे अण्णाचे मत आहे.

याच धाडसी स्वभावामुळे एके दिवशी अण्णाने आबासाहेब गरवारे या श्रेष्ठ उद्योगपतींना भेटण्याचे ठरवले. फॅक्टरी बांधताना सिमेंट मिळत नव्हते त्या वेळी वसंतदादा पाटलांसारख्या एका ज्येष्ठ मंत्रीमहोदयांना भेटण्याचे धाडस अण्णाने दाखवले होते. त्यावेळी त्यांच्याकडे प्रॅक्टोलॅकटच्या पॉलिथीनच्या मोकळया पिशव्या निघत व त्यापासून प्रोसेस करून लहान आकाराच्या पिशव्या बनविल्या जात. मनाचा हिय्या करून अण्णा आबासाहेब गरवारेंना

भेटायला त्यांच्या कोरेगाव पार्क येथील बंगल्यावर गेला. तेथे अण्णाला सुखद अनुभव आला. आबासाहेबांनी त्याची आस्थेने चौकशी केली व पिंपरीच्या प्लँटमधे फोन करून अण्णाला काम देण्याची सुचना दिली. अण्णाला फार आनंद झाला. संकटातून बाहेर पडाण्याची ती सुरवात होती. दुसऱ्या दिवसापासून तेथुन काम  मिळू लागले. रोज माल आणायचा, फाडायचा, धुवायचा, त्याचे दाणे पाडायचे व त्यापासून निरनिराळया आकाराच्या पिशव्या तयार करायच्या! काम तसे सोपे होते. तसेच कंपनी पण जवळ होती. आपोआप ती घडी बसली. त्यात मार्जीन कमी होते पण मशीन सुरु झाल्याचा आनंद होता.

बहुतेकवेळा माणसाच्या बाहेरील स्वरुपावरून त्याची पारख केली जाते. अनेकजण ही चुक परत परत करत असतात. त्यामुळेच पाटीलसारख्या माणसाचे फसवणुकिचे धंदे चालु शकतात. अण्णाची साधी पर्सनॅलिटी बघून अनेकांनी त्याच्याबद्दल गैरसमज करून घेतले, त्याला अंडरएस्टिमेट केले. तो एक भोळा भाबडा, सहज फसवण्याच्या लायकिचा एक साधारण मराठी उद्योजक आहे असा समज करून घेणारेच अण्णाला जास्त भेटत होते. त्याला अजूनही फसवण्याचा प्रयत्न करणारे लोक भेटतच होते. त्यावेळी शंतूनराव किर्लोस्करांसारखे जेष्ठ उद्योगपती जर पुण्यात सायकलवरून फ़िरताना, आबासाहेब गरवारे बैलगाडीतून फ़िरताना किंवा बी.जी. शिर्के टांग्यातून फ़िरताना लोकांना दिसले असते तर लोकांनी त्यांना उद्योगपती मानले नसते. पण सायकलवरून फिरले तरी शंतूनराव हे शंतूनरावच रहाणार होते. गरवारे हे गरवारेच रहाणार होते. तर बी. जी, शिर्के हे तेच रहाणार होते. हे सर्व उद्योजक सायकलवरून, बैलगाडीतून किंवा टांग्यातून फिरतात म्हणून त्यांच्या स्टेटसमधे काही फरक पडणार नव्हता.

उद्योजक म्हटला की तो नहमी सुटा, बुटात व टायमधे असलाच पाहिजे. जर सुट नसेल तर त्याने कमीत कमी बुट व टाय वापरलाच पाहिजे. त्याचे कपडे उत्तम इस्त्री केलेले भपकेबाज असलेच पाहिजेत. त्याला उंची सीगारेट्स लीलया पेटवण्याची सवय असली पाहिजे. त्याचे व्यक्तीमत्व रुबाबदार असले पाहिजे. त्याच्याकडे कमीत कमी फियाट सारखी मोटार असायला हवी. ऍम्बॅसॅडर असेल तर फारच उत्तम. ( कारण त्यावेळी भारतात या दोनच गाड्या मिळायच्या.) गाडी नसेल तर कमीत कमी स्कुटर तरी हवीच.( त्या वेळी स्कुटर असणे हेसुद्धा प्रतिष्ठेचे लक्षण समजले जायचे.) त्याला भपकेबाज इंग्लीशमधे बोलता यायला हवे. मराठीत बोलतानासुद्धा जास्तीत जास्त इंग्लीश शब्दांचा प्रयोग करायची त्याला सवय असायला हवी. त्याची वृत्ती बेफिकीर असायला हवी व त्याला मोठ्या मोठ्या बाता लीलया करण्याची कला

अवगत असायला हवी. तो पार्ट्या देणारा व पार्ट्यांमधे रमणारा असायलाच हवा. दररोज संध्याकाळी त्याचा डेरा पुण्याच्या एखाद्या बीअर बारमधे किंवा एखाद्या प्रतिष्ठित हॉटेलात पडलेला असलाच पाहिजे. तो रोटरी, लायन किंवा तत्सम एखाद्या प्रतिष्ठित क्लबचा मेम्बर असलाच पाहिजे. एखादा उद्योजक यशस्वी झाला आहे किंवा नाही हे ठरविण्याची ही मोजमापे त्यावेळी आस्तित्वात होती. अण्णा यात कुठेच बसत नव्हता.

अण्णाची अवस्था गावातील विधवेसारखी झाली होती. गावात एखादी विधवा असली तर जवळचे नातेवाईक तिच्या घरावर, शेतजमिनीवर डोळा ठेऊन असतात. उगीचच तिच्या घरी चकरा मारु लागतात. तिला ना ना प्रकारची अमिषं दाखवली जातात. कुणी आपला मुलगा दत्तक देण्याचा प्रयत्न करतात. तिला लागणारी प्रत्येक वस्तु घरी आणून दिली जाते. कारण पुढे मागे त्या विधवेच्या इस्टेटीवर हक्क सांगता यावा किंवा फुकटात वाटा मिळावा ही अपेक्षा असते.

अण्णाच्या फॅक्टरीत एक महिला कामगार कामाला येत असे. तिचा नवरा सेन्च्युरी एन्कामधे नोकरीला होता. त्यामुळे तिची आर्थिक परिस्थिती चांगली होती. ती नेहमी अण्णाची मापे काढायची. तिच्या अंगावर भारी भारी साड्या असायच्या तर अण्णाच्या बायकोच्या अंगावर साध्या सुती साड्या असायच्या. त्याच्या मुलीच्या अंगावर नीट नीटके कपडे नसायचे. असा भिकारडा मालक असतो का असे तिला वाटत असावे. कारण अंगावर पुरेसे घेण्यासाठी कपडे नव्हते. जमिनीवर गोधडी टाकून सर्व झोपत.

अशात एकदा अण्णाला पोस्टाने लग्नाची पत्रिका आली. वहिनींच्या जवळच्या नात्यातील कोणाचे तरी लग्न होते. त्यामुळे वहिनींना जावेसे वाटले. पण मुलीला, शुभांगीला घालायला चांगले कपडे नव्हते. अण्णाने लक्ष्मीरोडच्या फुटपाथवरून स्वस्तातला ड्रेस मुलीसाठी आणला. दुसऱ्या दिवशी अण्णा वहिनींना व मुलीला स्वारगेटला सोडून आला. लग्नात सौ. नी ते कपडे मुलीच्या अंगात घातले. पण हलक्या प्रतिचे असल्याने घालतानाच उसवले. मुलीला घालायला दुसरे कपडे नव्हते. त्यामुळे वहिनींचा चेहेरा शरमेने खाली गेला. आपल्या मुलीच्या अंगावर धड कपडेसुद्धा नाहीत ही गोष्ट प्रत्येक नातेवाइकाच्या लक्षात आल्याचे त्यांनी ओळखले. पुण्याला परत आल्यावर त्या अण्णाजवळ अक्षरशः ओक्साबोक्सी रडल्या.

आबासाहेब गरवारे यांना भेटल्याचा फायदा झाला म्हणून अण्णाने बी.जी. शिर्के यांना भेटायचे ठरवले. कॉलेज जीवनापासून अण्णा त्यांची प्रगती बघत आला होता. उद्योग

धंद्यात पुढे आलेला मराठी माणूस म्हणून अण्णाला त्यांच्याविषयी फार आदर वाटत होता. शिवाय ते सातारा जिल्ह्यातील वाईजवळच्या पसरणी गावाचे असल्यामुळे अण्णाला त्यांच्याविषयी जिव्हाळा वाटत होता. आपण खेड्यातील आहोत त्यामुळे आपले काम नक्की होईल अशी अण्णाची खात्री होती. अण्णा आपटे रोडवरील बंगल्यावर जाऊन शिर्केंना भेटला. त्याला काम देण्याचे वचन देऊन शिर्क्यांनी त्याला त्यांच्या मुंढवा येतील फॅक्टरीत बोलावून घेतले. त्यांची मुंढवा येथील सिपोरेक्स ही कंपनी कॉन्क्रीटच्या 'प्री फॅब्रिकेटेड' स्लॅब्ज बनविणारी भारतातील पहिली कंपनी आहे. बि. जी. शिर्के यांनी हे तंत्र स्वतः विकसीत केले आहे. स्थापत्यक्षेत्रातील नव्या तंत्राचे शिर्के हे जनक आहेत असे म्हणावे लागेल. कॉन्क्रीटचे स्लॅब बनवताना प्लॅस्टीक स्पेसर वापरले जातात. ते मोठ्या प्रमाणावर लागतात. त्यासाठी लागणारे मोल्डस त्यांच्याकडे होते. अण्णाकडे मशिन्स होती. त्यांनी ते मोल्डस् अण्णाला दिले. त्यामुळे बंद असलेले मोल्डींग मशीन सुरु झाले. अण्णा त्यांचे काम जवळ जवळ दोन वर्षे करत होता.

अण्णाला फसवण्याचा खेळ अजून बंद झाला नव्हता. नंदन गाडगीळ नांवाचे एक मराठी उद्योजक आहेत. युनायटेड इंन्डस्ट्रीज नावाची त्यांची कंपनी होती. सुप्रसिद्ध मराठी उद्योजक अविनाश वारदेकर यांचा हा भाचा. गाडगीळ श्रीमंत असल्याने तरुणपणीच धंद्यात पडले होते. पुण्यात टिळक रोडवर त्यांचे मोठे पॉश ऑफीस होते. व्यायामासाठी लागणारी प्लॅस्टीकची उपकरणे ते बनवत असत. टी.व्ही. वर त्यांची जाहीरात असे. कामाच्या निमित्ताने अण्णाचे तेथे येणे जाणे असायचे. त्यावेळी त्यांच्याकडे प्रधान नांवाचे एक सेल्समन होते. त्यांनी अण्णाला प्लॅस्टीक मोल्डींगचे काम देण्याचे अमीष दाखवले. ठाण्याला फायबर ग्लासचे उत्पादन करणारी फायबर पीलकींटन नावाची कंपनी होती. तेथे फायबरचा धागा काढून प्लॅस्टीकच्या बॉबीनवर भरला जायचा. त्याकरता हजारो प्लॅस्टीक बॉबिन्स लागायच्या. प्रधानांनी त्या बॉबीनचा नमुना अण्णाला दिला. तेथे माझे मेनन नावाचे पर्चेस मॅनेजर ओळखीचे आहेत, ते तुम्हाला काम देतील, तुम्ही याचा मोल्ड बनवून घ्या असे प्रधानांनी अण्णाला सांगितले. त्या वेळी धंद्यात असूनही अण्णाला स्क्रु टाईप व प्लंजर टाईप हे मशीनचे प्रकार माहीत नव्हते. अण्णाकडे प्लंजर टाईपचे साधे मशीन होते. या मशीनसाठी उत्कृष्ट दर्जाचे मोल्ड लागतात. हे मोल्ड फार महाग असतात. अण्णाने मुंबईहून मोल्ड बनवून आणला. त्याचे सॅम्पल काढले व प्रधानांना दिले. मग ऍडव्हान्स म्हणून प्रधानांनी अण्णाकडून पाच हजार रुपये घेतले. अण्णा ऑर्डरबद्दल त्यांच्याकडे विचारणा करत होता. ते अण्णाला झुलवत होते. ऑर्डर टाईप झाली आहे, पोस्टात पडली आहे असे सांगत असत. मेननला पार्टी देण्यासाठी म्हणून त्यांनी अजून पाच हजार रुपये मागितले. अण्णाने पण इकडून तिकडून पैसे गोळा करून त्यांना

दिले कारण त्याला काम मिळवायचे होते. त्यानंतर प्रधान कधी पुण्याला फ़िरकलेच नाही. इकडे अण्णा मोल्ड तर बनवून बसला होता. कंपनी पण त्याच्या माहितीतली होती. अण्णा सँपल घेऊन ठाण्याला त्या कंपनीत जाऊन मेनन यांना भेटला. तेथे गेल्यावर त्याच्या लक्षात आले की मुळात प्रधान व मेनन यांची ओळखच नव्हती. अण्णाला अर्थातच हे आवडले नाही. त्याने प्रधानांचा पत्ता शोधुन काढला व त्यांच्या जुहु चौपाटी येथील घरी गेला. प्रधानांची मिसेस एम. एस्सी झालेली होती व लेक्चरर होती. त्यांना अण्णाने सगळी हकीगत सांगितली. अण्णाला प्रधानांच्या मिसेस बऱ्या वाटल्या. पुढे अण्णाने बऱ्याच वेळा फोन केला. पण त्याचा उपयोग झाला नाही. अशा रितीने प्रधानांनी अण्णाचे दहा हजार रुपये हडप तर केलेच. पण पुढे ती ऑर्डर काही अण्णाला मिळाली नाही. त्यामुळे त्या बॉबीनसाठी तयार केलेला महागडा मोल्ड गळयात पडला ते वेगळेच. मराठी माणूसच मराठी माणसाला फसवण्यामधे धन्यता मानतो. याच प्रधानांना गुजराती, मारवाडी, सिंधी, पंजाबी, पारशी किंवा दक्षीण भारतीय उद्योजकाला फसवण्याचे धाडस झाले असते कां असा प्रश्न नेहमी अण्णाला पडतो.

## हिंमते मर्दा

## बारा

उद्योग व्यवसायात यशस्वी व्हायचे असेल तर शरीर प्रकृती उत्तम असणे आवश्यक असते. शरीरस्वास्थ्य चांगले नसेल तर काय घडते याचा पण अनुभव अण्णाने घेतला. 1978 सालची गोष्ट आहे. काही कामानिमित्त अण्णा सोलापुरला गेला होता. तो परत आला तेव्हा त्याला मळमळू लागले. डोके दुखु लागले. उलट्या होऊ लागल्या. हे प्रमाण संध्याकाळपर्यंत वाढतच गेले. अण्णा त्यामुळे हैराण झाला. उभे रहाण्याचीसुद्धा ताकद राहिली नाही. आधीच काम चालु नसल्याचे टेन्शन, पैशांची चिंता आणि त्यात हे आजारपण! अण्णाचे मन निराशेने ग्रासून गेले होते. आपले आता कसे होणार, आपण यातून बरे होऊ की नाही असे विचार त्याला सतावू लागले. माणसाच्या मनात एकदा का नकारात्मक विचार सुरु झाले की मग त्याची गाडी त्याच मार्गाने कशी धावु लागते याचा अनुभव यावेळी अण्णाला आला. जर शरीर निरोगी, सुदृढ असेल तरच माणूस चांगला विचार करु शकतो. अशक्तपणामुळे अण्णाचे मन निराशेने काळवंडून गेले होते. पोटात पाण्याचा थेंबसुद्धा टिकत नव्हता. काय करावे समजत नव्हते. डॉक्टरांना दाखवले पण निदान होत नव्हते. त्यांनी दिलेल्या औषधांचा परिणाम होत नव्हता. तब्येत खालावत चालली होती. त्यावेळी अण्णाचे मिलिटरीमधील बंधू येऊन गेले. त्यांनी काविळिची शंका व्यक्त केली. ते मिलीटरिच्या मेडीकल कोअर मध्ये होते. त्यांना मिलिटरिच्या दवाखान्यातील अनुभव असल्याने त्यांचे निदान बरोबर निघाले.

त्या काळात भोसरी म्हणजे एक खेडेगांवच होते. आजुबाजुला शेती होती, भुइमुग लावलेला होता. भोसरीतील एक वृध्ध गृहस्थ, त्यांचे आडनांव लांडगे होते, अण्णाच्या फॅक्टरीच्या आजुबाजुला गुरे चरायला घेऊन येत असत. ते कधी कधी अण्णाकडे गप्पा मारायला

येत असत. किंवा निघालेला भुइमुग अण्णाच्या गच्चीवर वाळत घालत. त्यांचे व अण्णाचे घरगुती संबंध तयार झाले होते. त्यांना त्याची अवस्था बघून वाईट वाटले. लोणावळयाला कोणीतरी माणूस आयुर्वेदीक औषध देतो असे त्यांनी सांगितले. काहीतरी उपाय करायला हवा होता. अण्णाने लोणावळयाला जायचे ठरवले. त्यावेळी अण्णा इतका अशक्त झाला होता की त्याला उभेसुद्धा रहावत नव्हते. अण्णाच्या नात्यातील दिनकर गवळी नांवाचा मुलगा आला होता. त्याने अण्णाला सायकलवर बसवले. थंडी वाजत होती म्हणून अण्णा एक चादर पांघरून सायकलवर डबल सीट बसला. दिनकरने अण्णाला सकाळी पिंपरी स्टेशनवर डबल सीट नेऊन सोडले कारण सकाळची लोणावळा लोकल पकडणे भाग होते. कारण लोणावळयाच्या माणसाकडे सकाळी लवकर जावे लागायचे. दिनकरने कसेतरी अण्णाला डब्यापर्यंत पोचवले. अण्णा डब्यापर्यंत पोचेपर्यंत गाडी चालु झाली होती.

अण्णा कसाबसा गाडीत चढला. या गडबडीत तिकीट घ्यायचे राहून गेले. कसाबसा अण्णा लोणावळयाला पोचला. त्या माणसाचे घर स्टेशनजवळच होते. त्याने लगेच अण्णाच्या नाकात औषध घातले. त्यानंतर काय झाले अण्णाला समजेना. अक्षरशः अण्णाच्या डोळयातून पाण्याच्या धारा लागल्या. नाक- तोंड सर्व पिवळया पाण्याने भरून वाहु लागले. त्या औषधाचा उलटा परिणाम झाला. अण्णाचे खूप हाल झाले. त्याची तब्येत आणखी बिघडली. तो पुण्याला कसा परत आला हे त्याला कळलेच नाही. दिनकरने कसेतरी अण्णाला एकदाचे घरी आणून पोचवले. यात बिना तिकीट प्रवास केल्याबद्दल टी.सी. ने चादर काढून घेतली ते वेगळेच. दुसऱ्या दिवसापासून अण्णाला थोडा- थोडा उतार पडू लागला. बंधुंच्या मदतीने लिव्ह 52 च्या गोळया सुरु केल्या. तसेच उसाचा रस, साखरेचं सरबत, दुध असा आहार सुरु केला. काही दिवसांनी बरे वाटु लागले. उठून बसण्याएवढी शक्ती अंगात आली आणि एका जीवघेण्या संकटातून बाहेर पडल्याने चित्त स्थीर झाले. आशा पल्लवीत होऊ लागल्या. शारीरिक स्वास्थ्य चांगले असेल तरच मनात चांगले विचार येतात, उमेद निर्माण होते हे अण्णाने चांगले ओळखले. त्यानंतर मात्र अण्णाने आपल्या शरीर प्रकृतिची योग्य काळजी घ्यायला सुरवात केली.

1980 सालची गोष्ट. निरनिराळे प्रयत्न करूनही अण्णाला काम मिळत नव्हते. घरखर्चासाठीसुद्धा पैसे मिळत नव्हते. अण्णाच्या या असहाय्यतेचा फायदा घेणारे अजूनही त्याला भेटतच होते. अण्णाची विजय नहार नांवाच्या माणसाशी ओळख झाली. ते अण्णाच्या धंद्यातलेच होते. ते पॉलिथीन बॅग्ज बनवत व ब्लो मोल्डींग करीत. ते उद्योग धंद्यातून आलेले

होते. त्यांना उद्योग व्यवसायाचा चांगला अनुभव होता. धंदा कसा करायचा, कोणाबरोबर करायचा याचे त्यांना चांगले ज्ञान होते. सामाजिक बांधीलकीवर ते सतत बोलत असत. ते अण्णाला बोलावून घेत. युनिट बंद असल्यामुळे व भयाण वातावरणातून थोडीशी सुटका मिळावी म्हणून अण्णा त्यांच्याकडे जात असे. ते मोठमोठी आश्वासने देत असत. माझ्यातील काम देईन असे नेहमी अण्णाला सांगत असत. मुंबईला काम मिळेल म्हणून अण्णा त्यांच्याबरोबर त्यांच्या गाडीतून मुंबईला जात असे. अण्णाला दिवसभर त्यांची बॅग संभाळण्याचे काम करावे लागे. काम संपल्यावर ते अण्णाच्या हातावर दोन रुपये ठेवत. कधी कधी तेही पैसे दिसत नसत. बसला पैसे नसल्याने पुष्कळवेळा अण्णा कासारवाडीहून भोसरीला चालत जात असे. गोड बोलून ते गृहस्थ अण्णाला मुंबईला घेऊन जात व गाडीतील सामान संभाळण्यासाठी वापरत. दिवसभर अण्णा उपाशी असे, पण त्याची त्यांना फिकीर नसे. एकदा रात्री साडेबारा वाजता ते चिंचवडला आले. त्यांनी अण्णाला चिंचवडला सोडले. घरी जायला सांगितले व ते निघून गेले. त्या भयाण रात्री चिंचवड ते भोसरी हे अंतर अण्णाला एकट्याने चालत जावे लागले. अण्णाला भोसरीपर्यंत सोडण्याचे साधे सौजन्य त्या गृहस्थाने दाखवले नाही. हाच गृहस्थ पुढे अण्णाचे यशाचे गोडवे गात होता.

अण्णा जे करत होता ते चुकीचे होते. पण त्याला योग्य मार्गदर्शन द्यायला कोणी नव्हते. आणि कोणी असते तर अण्णाने त्याचे ऐकले असतेच असे नाही. कारण अण्णाची परिस्थिती दारु प्यायलेल्या माणसा सारखी झाली होती. दारुड्याला जशी दारुची नशा येते तशी अण्णाला बिझिनेसची नशा चढली होती. दारु पिणारा माणूस झोकांड्या खात रात्री-अपरात्री घरी येतो. असभ्य बडबड करतो. बायकोवर हात उगारतो. बायकोला, मुलांना मारतो. बायको त्याची बडबड शांतपणे ऐकून घेते. कारण तिला माहीत असते की अशा परिस्थितीत नवऱ्याला काही सांगण्यात अर्थ नसतो. अण्णाचे तसेच झाले होते. त्याला धंद्याची नशा चढली होती. काहिही करण्याची त्याची तयारी होती. नशा, मग ती कोणत्याही प्रकारची असो, वाईटच! माणसाला त्याच्या धंद्याचा अभिमान जरुर असावा पण त्याची नशा असू नये. कारण या नशेपोटीच माणूस बिझिनेसमध्ये नको ते धाडस करून गोत्यात येत असतो असे अण्णाचे म्हणणे आहे.

पण यातूनही काही चांगल्या घटना घडत होत्या. एके दिवशी अरुणभाई मेहता नावाचे एक गुजराती गृहस्थ अण्णाकडे आले. त्यांना भाड्याची जागा हवी होती. विजेची जरुरी नव्हती. फक्त रिपॅकींगसाठी जागा हवी होती. वेगवेगळ्या प्रकारच्या प्लायवुडच्या खोल्या

करून त्याचा उपयोग कामासाठी करायचा होता. अण्णाला हायसे वाटले. कारण युनिट नाही चालले तरी पोटाची भ्रांत सुटणार होती. त्यांना 2500 स्क्वेअर फुट जागा 5000 रुपये डिपॉझीट व महिना 500 रुपये भाड्यावर दोन वर्षासाठी द्यायचे ठरले. त्यांनी एक दिवस ट्रकमधुन भरपुर प्लायवुड व सागवानी लाकुड आणून दुसऱ्या दिवशी सुतार बोलावले. त्याकाळी नुसत्या लाकडावर 25000 रुपये खर्च केला. त्यांना बोरीक पावडरचे लायसन्स घ्यायचे होते. एक दिवस फुड आणि ड्रग्जच्या अधिकाऱ्यांना घेऊन आले. त्यांना कुठे काय करणार हे दाखवले. मग त्यांना बोरीक पावडर व पेट्रोलियम जेलिचे लायसन्स मिळाले. सुरवातीच्या काळात पेट्रोलीयम जेलिचे ड्रम व पावडरची पॅक केलेली पोती येत. अण्णाच्या फॅक्टरीत निरनिराळया बाटल्यात भरून त्या मुंबईला नेत. 500 रुपये भाडे मात्र वेळेवर देत. अण्णाला हा गुजराती गृहस्थ कसोशीचा वाटला. काही वेळा मिळालेला माल ते परस्पर मुंबईला नेऊ लागले. त्यामुळे ते भाडे देण्यापुरतेच येत. पण काही काळानंतर ते आलेच नाहीत. अण्णा मात्र पैसे आल्यावर त्यांचे 5000 रुपये देऊन आला. खरे तर भाड्याने जागा देणे, त्याच्यावर पोट भरणे हा नाकर्तेपणाचा प्रकार होता. अण्णाला हा प्रकार मनापासून पसंत नव्हता.

अशा प्रकारे जसा ऊन पावसाचा खेळ चालतो त्याप्रमाणे अण्णाच्या आयुष्यात संकटे व संधी याचा खेळ सुरु झाला होता.

## हिंमते मर्दा

## तेरा

जंगलातील काही प्राणी दिवसभर भक्ष्य शोधत जंगलात फ़िरत असतात. त्याचप्रामाणे काही स्वार्थी व आप्पलपोटी माणसे सतत दुसऱ्यास भक्ष्य करण्यासाठी समाजात फ़िरत असतात.

एक दिवस गोडांबे नांवाचे एक गृहस्थ अण्णाकडे आले. तुम्ही फार चांगले काम करता आहात. तुम्हाला पैशांची जरुरी आहे असे कळले. मला तुम्हाला मदत कराविशी वाटते. माझी टेल्कोत वरपर्यंत ओळख आहे. आमच्या बॅंकेतून मी मदत देऊ शकतो असे ते अण्णाला म्हणू लागले. एकतर अण्णा कोणाला माझ्याकडे येऊ नका असे सांगू शकत नव्हता. कारण धंद्यासाठी माणसे येणे आवश्यक असते. त्यातून जर एखादा माणूस आपण होऊन मदत करायला तयार होत असेल तर त्याला नाही कसे म्हणायचे? पण जी माणसे येतात ती चांगली का वाईट हे ओळखण्याचे तंत्र अजून अण्णाला अवगत झाले नव्हते. अण्णाकडे येणारा प्रत्येक माणूस त्याला आपला वाटे. मुलीला द्यायला दुध नसले तरी आलेल्या प्रत्येक पाहुण्याला दुधाचा उत्तमपैकी चहा द्यावासा वाटे. गोडांबेंनी अण्णाला किती पैशांची जरुरी आहे हे विचारून घेतले. अण्णाने विचार केला की जर 10000 रुपये मिळाले तर त्यातून प्लॅस्टीकचे स्क्रॅप आणता येईल. त्याचे दाणे बनवून ते आपल्याला विकता येतील. म्हणून अण्णाने त्यांच्याकडे 10000 रुपयांची मागणी केली. खरोखरच दुसऱ्या दिवशी त्याने 10000 रुपये आणून दिले. अण्णा त्याची पावती द्यायला तयार होता तर नको म्हणून ते गाडीतून निघून गेले. दोन चार दिवसांनी ते आले व अण्णाला म्हणाले की चल आपण पुण्याला जाऊ, मला एके ठिकाणी जायचे आहे. अण्णा त्यांना नाही म्हणु शकला नाही. त्यांनी अण्णाला त्यांच्या गाडीतून पुण्याला आणले, डेक्कनवर चांगल्या हॉटेलात जेवण दिले. नंतर अण्णाला म्हणाले की चल आपण ब्ल्यु फिल्म बघायला जाऊ.

अण्णाला ब्ल्यु फिल्म्स हा काय प्रकार असतो हेसुद्धा माहीत नव्हते. पण तो या निळ्या फिल्मचा धोका जाणून होता. पोटात दुखत असल्याचे निमित्त सांगत अण्णाने पाय काढून घेतला.

दुसऱ्या दिवशी ते कोरा स्टॅम्प पेपर घेऊन अण्णाकडे आले व त्याची सही मागु लागले. त्यावेळी त्याच्या पाठिशी कोणी नव्हते. पण ज्यांच्या पाठिशी कोणी नसतो त्यांच्या पाठिशी परमेश्वर असतो. निदान अण्णासारख्या माणसाच्या पाठिशी तो नक्कीच उभा असतो. उद्या बघु म्हणून अण्णाने वेळ मारून नेली. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी सातच्या सुमारास तीन चार गुंड माणसे अण्णाच्या फॅक्टरीत घुसली. अण्णाने त्यांना लांबुनच पाहिले. आज आपली काही धडगत नाही हे ओळखुन अण्णा मेहतांनी बनवलेल्या एका खोलीत लपून बसला. ती माणसे गोडांबेंनी अण्णाची कोऱ्या स्टॅम्प पेपरवर बळजबरिने सही घेण्यासाठी म्हणून पाठवली होती. त्यांनी अण्णा कुठे आहे म्हणून चौकशी केली तेव्हा अण्णा मुंबईला गेल्याचे वहिनींनी सांगितले. तरी पण एक तास अण्णाची वाट बघून ती माणसे निघून गेली. केवळ 10000 रुपयांच्या मोबदल्यात अण्णाच्या फॅक्टरीवर कब्जा करण्याची गोडांबेची चाल अण्णाच्या लक्षात आली होती. लगेचच अण्णाने नातेवाइकांना वीनवण्या करून 10000 रुपये जमा करून गोडांबेला परत देऊन टाकले. पुढे याच गोडांब्यांनी युनिट व्यवस्थित चालु झाल्यावर अण्णाला शाबासकीसुद्धा दिली.

आता काम व्यवस्थित चालायला लागले होते. देण्याघेण्याचे व्यवहार पण होऊ लागले होते. पण बाजारात पत नसेल तर काय होते याचा पण अनुभव अण्णाने घेतला. त्याचे एक सप्लायर होते. त्यांचे पैसे द्यायला सहा दिवसांचा उशीर झाला होता. त्यांचा फोन आला. अण्णा त्यावेळी बाहेर गेला होता. फोन वहिनींनी घेतला. त्यांनी फोनवर पैशांची चौकशी केली व अण्णा घरी नाही म्हटल्यावर त्यांना राग आला. चाकु घेऊन माणूस पाठवण्याची धमकी देऊ लागले. तुम्ही चाकु घेऊन माणूस पाठवा मग पैसे देऊ असे वहिनींनी सांगताच तो माणूस वरमला व सौम्य भाषेत बोलु लागला. खरंच कुणाच्याही पोटात गोळा येईल अशी अवस्था होती पण वरकरणी न घाबरता खंबीर उत्तर दिल्याने वेळ निभावून गेली. पुढे अण्णाचे व त्या गृहस्थांचे चांगले संबंध निर्माण झाले. लाखो रुपयांचे व्यवहार झाले. पण ती आठवण मात्र कायमची लक्षात राहिली आहे.

अण्णाकडे खेळते भांडवल अजिबात नव्हते. त्यात तीन चार वर्षे निघून गेली. पण या काळात एक महत्वाचे काम राहून गेले, ते म्हणजे एम.एस.एफ.सी चे कर्ज फेडायचे.

त्याकाळात अण्णाला एम.एस.एफ.सी चे व्याजाचे पैसे देणे जमले नव्हते. त्यामुळे त्यांचे कर्मचारी फॅक्टरीत येऊन दम देऊन जात. फॅक्टरी खाली करायला सांगत. पण का कोण जाणे अण्णाला वाटे की आपण यात यशस्वी होऊ. त्यात दुसरे कन्यारत्न झाल्याने अण्णावरची संसारिक जबाबदारी आणखी वाढली होती. अण्णाच्या जागी दुसरा कोणताही मराठी माणूस असता तर त्याने हाय खाऊन धंद्याचा नाद सोडून दिला असता आणि सरळ नोकरीचा रस्ता पकडला असता. कारण एम. एस्सी. मॅथेमॅटिक्स सारखी चांगली नोकरी मिळायला उपयुक्त ठरतील अशी क्वालिफिकेशन्स अण्णाकडे होती. एखाद्या शाळेत, कॉलेजमधे किंवा कंपनीत अण्णाला चांगली नोकरी सहज मिळून गेली असती. पण अण्णाचा स्वभाव जिद्दी होता. काहिही झाले तरी आपण नोकरी करायची नाही हे त्याने ठरवूनच टाकले होते. जिद्दी स्वभावाला लोक हट्टी स्वभाव असे पण म्हणतात. पण हट्टी स्वभाव व जिद्दी स्वभाव यात फरक आहे. हट्टी माणूस आपल्या चुकासुद्धा परत परत हट्टीपणामुळे करत असतो. त्याला इतरांनी केलेला उपदेश व मार्गदर्शन सहन होत नसते. जिद्दी माणसाचे तसे नसते. आपले इप्सीत साध्य करण्यासाठी ज्या ज्या गोष्टींची आवश्यकता असते त्या त्या गोष्टी करायची त्याची नेहमीच तयारी असते. त्यासाठी आपल्यामधे, आपल्या कार्यशैलीमधे, आचार विचारांमधे बदल करायची त्याची सतत तयारी असते. इतरांच्या उपदेशाचा, मार्गदर्शनाचा तो नेहमीच आदर करत असतो. अण्णा जिद्दी होता पण हट्टी नव्हता.

एम.एस.एफ.सी. चे कर्ज अण्णाने वेळेवर परत केले नाही म्हणून त्यांनी खटला दाखल केला होता. पण त्यामुळे अण्णा डगमगला नाही. आबासाहेब गरवारे, बी.जी. शिर्के यांच्या कंपन्यांकडून नियमित काम मिळू लागल्याने अण्णाचा कॅश फ्लो वाढला होता. अण्णाला अनेक लोकांचे पैसे द्यायचे असत. त्यांचे पैसे दिल्यावर जे पैसे शिल्लक रहात असत ते अण्णाने एम.एस.एफ.सी ला द्यायला सुरवात केली. त्यांचे पैसे पुर्णपणे फेडले. त्यामुळे त्यांनी अण्णावरील खटला काढून घेतला.

याच काळात अण्णाला काही चांगली माणसे पण भेटली. माणसे जोडण्याचा छंद अण्णाला लहानपणापासूनच होता. लहानपणी अण्णाला उत्तम कांबळे, हनुमंत माने सारखे जिवलग मित्र मिळाले होते. कॉलेज जीवनात त्याला विकास पाटोळेसारखा अण्णावर नितांत प्रेम करणारा मित्र मिळाला होता. तसेच काही उत्तम असे व्यावसायिक सहकारी पण मिळाले. पहिल्यापासूनच अण्णाचे सर्व आर्थिक व्यवहार सेन्ट्रल बँक ऑफ इंडिया मार्फत होत आहेत. त्याला जोगळेकर नांवाचे त्याच्या बँकेचे मॅनेजर भेटले. अण्णाची अडचण लक्षात घेऊन त्यांनी

त्याला थोडा-थोडा फायनान्स द्यायला सुरवात करून एक प्रकारची मायक्रो फायनान्स स्कीमच सुरु केली. घेतलेले कर्ज वेळच्या वेळी फेडायची सवय लावली. छोट्या रकमांचे कर्ज असल्यामुळे अण्णाला ते सहज जमू लागले. जोगळेकरांमुळे अण्णाला आर्थिक शिस्त लागली. त्याच बँकेतील दुसरे अधिकारी साळवे यांनी अण्णाच्या अकाऊंट्सची व प्रोजेक्ट रिपोर्टची जबाबदारी उचलली. नगरहून आलेले राजेन्द्र बोरा नावाचे एक तरुण सी.ए. अण्णाला भेटायला आले. त्यांनी ऑडीट व टॅक्सेसची जबाबदारी उचलली. पहिली चार वर्षे फॅक्टरी चालली पाहिजे व कामगारांना वेळच्या वेळी पगार देता यायला पहिजे यापेक्षा जास्त महत्वाचे काही नव्हते. पण जोगळेकर, साळवे, बोरा यांच्यामुळे अण्णाची आर्थिक साक्षरता वाढु लागली. पैशांचे व्यवहार समजु लागले. आर्थिक शिस्तीबरोबर आर्थिक नियंत्रणे कशी ठेवायची हे पण समजु लागले. बॅलन्स शीट, ट्रायल बॅलन्स, प्रॉफीट ऍन्ड लॉस या गोष्टी समजु लागल्या. आर्थिक शिस्त आल्यामुळे पैशांची वसुली वेळच्या वेळी होणे, सगळयांचे पैसे वेळच्यावेळी देणे, कर्जाचे हप्ते वेळच्यावेळी देणे, सर्व प्रकारचे टॅक्सेस वेळच्या वेळी भरणे हे प्रकार होऊ लागले. त्यामुळे बाजारामधे अण्णाची व त्याच्या कंपनीची पत कित्येक पटीने वाढली.

अण्णाला त्याचा धाडसी स्वभाव नेहमीच उपयोगी पडत आला होता. क्लोराइड इंडिया या कंपनीला मटेरीयल प्रोसेस करून देणारी पार्टी हवी आहे असे अण्णाला समजले. त्याच्याकडे त्या प्रकारच्या प्रोसेसींगला लागणारी मशीनरी होती. अण्णा त्या कंपनीत जाऊन पर्चेस असीस्टंटला भेटला पण तो काही दाद देईना. मटेरीयल प्रोसीसींगला द्यायचे नाही असे सांगून त्याने अण्णाची बोळवण केली. पण अण्णाला पक्के ठाऊक होते की मटेरीयल प्रोसेसींगला द्यायचे आहे. दोन चार वेळा भेटूनही तो असीस्टंट अण्णाला हुडुतच करत होता. शेवटी मनाचा हिय्या करून अण्णा सरळ मटेरीयल्स मॅनेजरच्या केबीनमधेच घुसला. यांना खरोखरच गरज होती. त्यांनी लगेच गाडी काढली व अण्णाचे युनिट बघायला आले. दुसऱ्या दिवशी त्यांनी 25 किलो मटेरीयल प्रोसेसींग साठी दिले. अण्णाकडे सायकल शिवाय दुसरे वाहन नव्हते. त्याने ते 25 किलो मटेरीयल सायकलवरून आणले व प्रोसेसींगला दिले. पुढे पुढे काम वाढले. सकाळी व संध्याकाळी अशा दिवसातून दोन खेपा अण्णाला माराव्या लागत. ते 1979 साल असावे. त्यानंतर अण्णाची सतत प्रगतीच होत गेली. याच काळांत अण्णाला तीसरे कन्यरत्न प्राप्त झाले. अण्णाला असे वाटते की या मुलीचा पायगुण चांगला निघाला. कारण तिच्या जन्मापासून अण्णाच्या भरभराटीला खऱ्या अर्थाने सुरवात झाली व त्याला मागे वळून पहावे लागले नाही. असे असले तरी अण्णाचे त्याच्या सगळया मुलांवर सारखेच प्रेम आहे.

या काळात अण्णाला त्याच्या गावी जाता आले नव्हते. तो आपल्या गावापासून दुरावल्यासारखा झाला होता. आई आई करणारा अण्णा पण त्याचे आपल्या आईकडे पण पुर्ण दुर्लक्ष झाले होते. मॅट्रीक नंतर अण्णा पुण्याला शिकायला म्हणून आला तो पुण्याचाच बनला. पण त्याचा आपल्या गावाविषयीचा जिव्हाळा व प्रेम जरा सुध्दा कमी झाले नव्हते. फक्त गावात आपली काय पत आहे याची त्याला कल्पना नव्हती. त्याकाळात अण्णाच्या गावी हायस्कुल निघाले होते. एके दिवशी त्या हायस्कुलचे मुख्याधापक पवार सर अण्णाकडे आले. हायस्कुलच्या स्नेहसंमेलनाचे प्रमुख पाहुणे म्हणून ते अण्णाला बोलवायला आले होते. आपण खरोखरच एवढे मोठे झालो का या प्रश्नाने अण्णाला अंतर्मुख केले. सहा सात वर्षानंतर अण्णा गावाला गेला. गावातील फरक त्याला जाणवला. आता गावात वीज आली होती. रस्ते रुंद झाले होते. लोकांच्या रहाणीमानात फरक पडला होता. लहान लहान मुले ऐटीत पँट घालून फ़िरत होती.

संपुर्ण गावातून अण्णाची मिरवणुक काढण्यात आली. त्याला सुवासिनिंनी ओवाळले. स्टेजवर अण्णा, रत्नमाला वहिनी, सरपंच सर्जेराव बापु व हेडमास्तर बसले होते. अण्णाच्या घरचे सगळे समारंभाला आले होते. बरेच वक्ते अण्णाबद्दल बोलले. अण्णा काय बोलला हे त्याला आठवत नाही. पण अण्णाचे भाषण संपल्यावर बऱ्याच वेळ टाळया वाजत होत्या एवढेच त्याला आठवते. थोडक्यात अण्णाच्या कर्तबगारीची त्याच्या गावाने योग्य ती दखल घेतली होती याचे त्याला समाधान वाटत होते.

# हिंमते मर्दा

## चौदा

महात्मा गांधींचे एक स्वप्न होते की भारतामधे गावा-गावांत उद्योग धंदे निघावेत, खेडो-पाडी कारखाने निघावेत. त्यांचे म्हणणे होते की जोपर्यंत खेडे गावांचा विकास होत नाही तो पर्यंत खऱ्या अर्थाने भारताचा विकास होणार नाही. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर महात्मा गांधींच्या कॉंग्रेस पार्टीचे सरकार अनेक वर्षे सत्तेवर होते. त्यानंतर इतर पार्ट्यांची सरकारे सत्तेवर आली. सत्तेवर आलेल्या प्रत्येक सरकारने खेड्यात चला- खेड्यात चला असा घोष लावला. पण सरकारी घोषणा आणि प्रत्यक्षातील सरकारची कृती व धोरण यात किती विसंगती असते याचा पण अनुभव अण्णाला यायचा होता.

आपल्या गावी कारखाना काढावा असे अण्णाचे लहानपणापासूनचे स्वप्न होते. मॅट्रीकनंतर अण्णा शिक्षणासाठी म्हणून पुण्याला आला व तेथेच स्थाइक होऊन पुणेकर बनला. पण असे असले तरी त्याची आपल्या गावाविषयीची ओढ, प्रेम, आत्मीयता जरासुद्धा कमी झाली नव्हती. गावातील परिस्थिती उद्योग धंद्यासाठी अनुकुल नसल्यामुळे अण्णाला काही करता येत नव्हते. आता हळु हळु गावातील परिस्थिती बदलु लागली होती. अण्णा वारंवार गावी जात असल्यामुळे त्याला हा बदल जाणवु लागला होता. आता गावात वीज आली, टेलिफोन आले, रस्ते रुंद झाले. गावापर्यंत एस.टी. बस येऊ लागली. गावातील परिस्थिती उद्योग धंद्यासाठी अनुकूल बनू लागली. पण अजूनही अण्णाला आपले स्वप्न साकार करण्याची संधी मिळत नव्हती.

1980 साली सर्व भाऊ विभक्त झाले होते. त्यांत अण्णा व त्याचे थोरले बंधु तात्या यांच्या वाट्याला गावांतील जमीन आली होती. त्या जमिनीवर अण्णाचे जुने घर उभे होते. आता ते घर पार मोडकळिला आले होते. घराची पार दैना झाली होती. पाऊस आला की

आतले धान्य, कपडे भिजुन जात. भिंतीला ओल येत असे. जमिनीचे पोपडे निघाले होते. गावातील माणसे आली की बसण्यासाठी घोंगडी टाकावी लागे. अण्णाची आई म्हणायची की मला चार मुले, पण एकाही कारट्याने घर बांधले नाही. बाकिच्यांची बघा कशी घरे आहेत. अण्णाने पुण्याला फॅक्टरी बांधली होती पण घर बांधले नव्हते. गावात चांगले घर असणे ही गोष्ट प्रतिष्ठेची, अभिमानाची तसेच आर्थिक उन्नतीचे प्रतीक म्हणून समजली जायची. आपण आपल्या आईची ही इच्छा पुर्ण करु शकत नाही याबद्दल अण्णाला वाईट वाटायचे.

1990 साली परिस्थिती सुधारल्यावर, तात्यांच्या सल्याने, अण्णाने गावात दोन मजली घर बांधायला काढायचे ठरवले. हे घर अण्णा व तात्या यांच्यात सामाइक होणार होते. निम्मे घर अण्णाच्या वाट्याचे तर निम्मे घर तात्यांच्या वाट्याचे, मधे एक समाइक जिना काढायचे ठरले. अण्णाच्या वाट्याला जे घर येणार होते त्यात तो काही रहाणार नव्हता. मग आपल्या वाटणीच्या घरात दोन प्लॅस्टीक मोल्डींग मशिन्स का टाकु नयेत असा विचार अण्णाच्या मनात आला. अण्णाने तो विचार तात्यांना बोलून दाखवला. तात्यांनी पण काही हरकत घेतली नाही. घराचे बांधकाम चालु होते. प्लॅन्स पण तयार होते. गावात कारखाना काढायचे अण्णाचे स्वप्न साकार होणार होते. त्याला वारंवार गावी येता येणार होते. गावांतील लोकांमधे मिसळता येणार होते. सरकार म्हणते खेड्यात उद्योग धंदे काढा, आम्ही सगळी मदत देऊ. पण सरकारच्या या आवाहनाचा कोणी विचार करत नाही. आपण खेडेगावांत लघु उद्योग सुरु करायचा प्रयोग करून बघायचा, एक नवीन पायंडा पाडायचा असे अण्णाने ठरवले. ज्या गावात साधा लोखंडी खिळा पण मिळत नाही अशा गावात अण्णा कारखाना काढणार होता. त्यासाठी त्याला आजुबाजुच्या परिसरातून काम मिळणार नव्हते ही मशीन चालवायला कामगार मिळणार नव्हते. त्यामुळे असा कारखाना काढणे हे एकप्रकारचे धाडसच होते. अण्णाचा स्वभाव धाडसी असल्यामुळे व गांवच्या प्रेमाखातर अण्णाने हे धाडस करायचे ठरवले. एकदा गावी कारखाना काढायचा हे ठरविल्यावर अण्णा लगेच कामाला लागला.

आपल्या गावातील या युनिटला गावातील वांगना नदीचे नाव देऊन अण्णाने 'वांगना प्लॅस्टीक इंडस्ट्रीज' असे नाव ठेवायचे ठरवले. यासाठी एम. एस. एफ. सी. कडून कर्ज घ्यायचे ठरवले. कारण पुण्याच्या युनिटसाठी अण्णाने त्यांच्याकडूनच कर्ज घेतले होते. सरकारी धोरणाप्रमाणे आपण खेडेगावात कारखाना काढत आहोत. एम.एस.एफ.सी. पण सरकारचीच आहे. त्यामुळे आपल्याला त्यांच्याकडून भरपुर सहकार्य मिळेल या अपेक्षेने अण्णाने त्यांचे कोल्हापुर ऑफीस गाठले. पण त्यांचेकडून अण्णाला काही फारसा उत्साहवर्धक प्रदिसाद मिळत

नव्हता. उलट खेडेगावातील हे युनिट चालेल की नाही याबद्दल त्यांना शंका येत होती. अण्णा हर प्रकारे त्यांना समजऊन सांगायचा प्रयत्न करीत होता. पण कर्ज देण्यामधे ते काही फारसे उत्सुक दिसत नव्हते. एक सरकारी संस्था असूनही त्यांचे धोरण सरकारच्या धोरणाच्या विरुद्ध होते. शेवटी प्रत्यक्ष जागेला भेट देऊन नंतर काय निर्णय घ्यायचा तो घ्या अशी अण्णाने विनंती केली. त्यावेळी बाबर म्हणून रीजनल मॅनेजर होते. त्यांना अण्णाचे म्हणणे पटले. ते लगेच पुढच्या आठवड्यात कायदा विभागाच्या महिला अधिकाऱ्यांसह भेटीला आले. अण्णाने त्यांना गांव फिरवून दाखवला, युनिटची जागा दाखवली. गांवचे सरपंच बापु बरोबर होतेच. बाबर साहेबांना गावातील माणसे, त्यांचा पाहुणचार आवडला. ते अण्णाला म्हणाले की या गावांतील युनिट तुम्ही यशस्वीपणे चालवु शकाल असा आत्मविश्वास तुमच्यात आहे. तसेच अशा प्रकारचे युनिट चालवण्याचा अनुभव पण तुमच्यापाशी आहे. त्यामुळे कर्ज द्यायला काही अडचण येणार नाही. त्यांनी अण्णाला त्यांच्या विहीत नमुन्यात अर्ज करायला सांगितले. अशा रितिने एम.एस.एफ.सी कर्ज द्यायला तयार झाले पण त्यासाठी अण्णाला बरेच रक्त आटवावे लागले.

बाबर साहेबांनी कर्ज देण्याचे मान्य केले. आता कागद पत्रांची पुर्तता करायची होती. त्यासाठी लघुउद्योगाची तात्पुर्ती नोंदणी करून घेणे आवश्यक होते. पण त्यावेळी अण्णापुढे नवीनच अडथळा उभा राहिला. अण्णा जे युनिट उभे करणार होता ते ग्राम पंचायतीच्या हद्दीत होते. त्यासाठी ग्राम पंचायतीच्या परवानगिची आवश्यकता पुरेशी होती. त्यामुळे ग्राम पंचायतीच्या ना हरकत प्रमाणपत्रासह अण्णाने जिल्हा उद्योग केन्द्राकडे अर्ज केला. त्यावेळी त्याला बिगर शेती प्रमाणपत्राचा ( N. A. - Non Agricultural Land) दाखला देणे पण आवश्यक असल्याचे सांगण्यात आले. अण्णाच्या मते ग्राम पंचायतीच्या हद्दीत येणारी जमीन ही बिगर शेती जमीन म्हणूनच समजली जाते. तसेच जिथपर्यंत शेती होत नाही तिथपर्यंत ग्राम पंचायतीची हद्द समजली जाते. जर एखाद्याने ग्राम पंचायतीच्या हद्दीबाहेर जमीन घेऊन लघुउद्योग काढायचे ठरवले तर त्याच्यासाठी बिगर शेती जमिनीचे प्रमाणपत्र आणणे आवश्यक ठरते. पण ग्राम पंचायतीच्या हद्दितील लघुउद्योजकांना बिगर शेती जमिनीचे प्रमाणपत्र आवश्यक असणारा फतवा कित्येक लघुउद्योजकांना मारक ठरणार होता. कारण हा दाखला मिळविण्यासाठी काय मेहेनत घ्यावी लागते, सरकारी कचेऱ्यांमधे किती चकरा माराव्या लागतात, किती पैसे खर्च करावे लागतात, किती वेळ लागतो याची अण्णाला कल्पना होती. त्यासाठी सहा महिनेतरी लागतात. ज्याच्याकडे पुरेसे भांडवल नाही तो तीथेच खचून जाणार. अण्णासमोर ही अडचण उभी राहिली. अण्णा जिल्हा उद्योग केंद्राच्या प्रमुखांना जाऊन

भेटला. त्यांना प्रश्न समजाऊन सांगितला. खेड्यामधे उद्योग व्यवसाय वाढवावा असे जर सरकारचे धोरण असेल तर हा नियम सरकारी धोरणाशी संपुर्णपणे विसंगत असा आहे. त्यामुळे कोणी पुढे येणार नाही. तुम्ही कित्येक होतकरु लघुउद्योगांना मारक ठरणार आहात असे अण्णाने त्यांना सांगितले. पण त्याचा काही फारसा फायदा झाला नाही. उद्योग संचालकांकडून तसे परिपत्रकच आले आहे. आमचे हात बांधलेले आहेत. आमचा नाईलाज आहे. आंम्ही काही करु शकत नाही असे अण्णाला सांगण्यात आले. शेवटी त्यांनी अण्णाला मुंबईला जाऊन उद्योग संचालक श्री.देशमुख म्हणून आहेत त्यांची भेट घेण्याचा सल्ला दिला. त्यानंतर अण्णाने सातारच्या दै. ऐक्य मधुन या पश्नाला वाचा फोडली.

ऐक्य मधील लेखाचे कात्रण घेऊन अण्णा मुंबईला सचिवालयात देशमुख साहेबांना भेटायला म्हणून गेला. याआधी अण्णा कधी सचिवालयात आला नव्हता. त्याला येथील काम कसे चालते याची कल्पना नव्हती. त्याने एका अधिकाऱ्याला याबाबत विचारले तर तो दुसरीकडे जा म्हणायचा. त्याच्याकडे गेले तर तो तिसरीकडे जा म्हणायचा. अशी अण्णाची टोलवा टोलवी सुरु झाली होती. देशमुख साहेब मिटींगमधे असत. मग लगेच बाहेर जात. दिवसभर बसून बसून अण्णा पार कंटाळून गेला. पण देशमुख साहेबांची भेट काही झाली नाही. मग अण्णा कंटाळून गाववाल्याच्या खोलीवर जाऊन झोपला व दुसऱ्या दिवशी बरोब्बर सकाळी साडेदहा वाजता सचिवालयात हजर झाला. देशमुख साहेब साडेबारा वाजता ऑफीसमधे आले. ते आल्या आल्या अण्णाने आत चिठ्ठी पाठवली. त्यात अण्णाने येण्याचे कारण लिहिले. आज वेळ नाही, नंतर या असा सरकारी पद्धतीने हुज्जत करणारा शेरा मारून चिठ्ठी परत आली. अण्णाच्या मनांत तडवळे गांवात आपला छोटा उद्योग काढण्याची जी प्रबळ इच्छा निर्माण झाली होती त्याला तडा जाऊ द्यायचा नव्हता. वीज चमकावी तसा अण्णा उठला आणि सरळ देशमुख साहेबांच्या केबीनमधेच घुसला. देशमुखांनी त्याला बाहेर जायला सांगितले. पण अण्णाने साफ नकार दिला. त्यांचेसमोर ठाण मांडूनच बसला. अण्णाने त्याचे म्हणणे पटवून द्यायचा प्रयत्न केला. पण ते दाद देइनात. जोपर्यंत तुम्ही बिगर शेती प्रमाणपत्राची अट रद्द करत नाही तोपर्यंत मी येथुन हलणार नाही असे अण्णाने निक्षुन सांगितले. देशमुख साहेब थोडेसे नरमले. हा निर्णय आम्ही व वनखात्याने मिळून घेतला आहे. त्यामुळे मला एकट्याला हा निर्णय बदलणे शक्य होणार नाही. पण तुमच्या युनिटसाठी बिगर शेती जमिनीचे प्रमाणपत्र मिळेल अशी मी व्यवस्था करतो असे देशमुखांनी अण्णाला सांगितले. त्यांनी लगेच त्यांच्या क्लार्कला बोलावून सातारच्या कलेक्टरांना तसे पत्र लिहिण्यास व त्या पत्राची एक प्रत अण्णाला देण्यास सांगितले. दुसऱ्या दिवशी सकाळी अकरा वाजता येऊन अण्णाला त्याची प्रत घेण्यास सांगितले.

झाल्या प्रकाराने अण्णा बराच वैतागला होता. उगीचच कारण नसताना देशमुख साहेबांबरोबर झगडा करावा लागला होता. अण्णा सरळ चालत चालत गेटवे ऑफ इंडियाला गेला. बराच वेळ इकडे तिकडे भटकला आणि मित्राच्या खोलीवर जाऊन झोपला. दुसऱ्या दिवशी पत्राची प्रत घेण्यासाठी सकाळी अकरा वाजता अण्णा सचिवालयात गेला. प्रत मिळायला संध्याकाळचे चार वाजले. अण्णा त्याच दिवशी संध्याकाळी पुण्याला परत यायला निघाला. दुसऱ्या दिवशी तो सातारला कलेक्टर कचेरीत पत्राची प्रात घेऊन पोचला. पण पत्राची ओरीजनल प्रत मिळाल्याशीवाय काही करता येणार नाही म्हणून सांगण्यात आले. पत्राची मुळ प्रत मिळायला चार दिवस लागले. त्यानंतर सातारच्या कलेक्टर साहेबांनी कोरेगांव तालुक्याच्या मामलेदारांना अण्णाच्या युनिटला बिगर शेती जमिनीचे प्रमाणपत्र देण्याविषयी पत्र पाठवले. तोपर्यंत जिल्हा उद्योग केंद्राकडे केलेल्या अर्जाची मुदत संपत आली होती. पंधरा दिवसांनी व अर्जाच्या शेवटच्या टप्प्यात एकदाचे बिगर शेती जमिनीचे प्रमाणपत्र मिळाले व अण्णाचा जीव भांड्यात पडला. प्रत्यक्षात जरुरी नसलेल्या पण सरकारच्या अव्यवहार्य निर्णयामुळे जरुरीचे झालेल्या बिगर शेती जमिनीच्या प्रमाणपत्राच्या कागदाच्या एका छोट्या तुकड्यासाठी अण्णाला जी धावपळ करावी लागली व जो बहुमुल्य वेळ वाया गेला ते अण्णा वीसरु शकत नाही.

अण्णाने 15 लाख रुपयांचा प्रोजेक्ट रिपोर्ट तयार केला. धंदा लहान होता. अण्णाला त्याची कल्पना होती. पण तडवळेसारख्या एका छोट्या खेडेगावात तो यशस्वी करून दाखवायचा होता. एम. एस.एफ.सी कडून कर्ज मंजुर व्हायला चार महिने लागले. तोपर्यंत इमारतीचे काम होत आले होते. अण्णाने त्यांचा व्हॅल्युअर सांगलीवरून आणला. त्याचा अहवाल कोल्हापुरला पाठवला व सुरवातीस पैसे उचलले. अण्णाने एक प्लॅस्टीक मोल्डींग मशीन आगोदरच आणून टाकले होते. काही दिवसांनी दुसरे मशीन पण आणले. ते चालवण्यासाठी पुण्याहून कामगार आणले व त्यांची रहाण्याची सोय केली.

वांगना प्लॅस्टीकला काम कोणते द्यायचे हा मोठा प्रश्न होता. कारण आजुबाजुच्या परिसरातून काम मिळणे शक्य नव्हते. त्यामुळे पुण्याचेच काही काम या ठिकाणी पाठवणे आवश्यक होते. त्या वेळी अण्णाकडे क्लोराईड कंपनीचे काम पुष्कळ होते. पण त्यांना रोजच्या रोज मटेरीयल द्यावे लागे. कारण ते मटेरीयल लगेच असेंब्लीवर घेत. त्यामुळे ते काम देणे शक्य नव्हते. त्यावेळी अण्णाकडे पुण्याच्या अमोघ इंडस्ट्रिचे बरेच काम होते. मिनरल वॉटरसाठी लागणार्या प्लॅस्टीक बॉटल्सचे त्यांचे उत्पादन होते. त्याला लागणाऱ्या कॅप्स बनविण्याचे काम

अण्णाकडे होते. त्यांना महिन्याला तीन लाख कॅप्स लागत असत. अण्णाने हे काम वांगना प्लॅस्टीकला दिले. अण्णाला इलेक्ट्रॉनीक्स कंपनीचे काम करण्याची इच्छा होती. कारण तिथे जे मोल्डींग पार्टस लागतात त्यात दर्जाला फार महत्व असते. त्यासाठी अण्णाने अशा प्रकारचे काम मिळू शकते का याची चाचपणी करायला सुरवात केली व त्यात त्याला यश पण मिळाले. मिलीटरी करता ज्या बॅटरी बनवल्या जातात त्याचा उपयोग जवानांना आघाडीवर होतो. त्यासाठी लागणारे इलेक्ट्रॉनिक्स पार्ट बनवायचे होते. उत्पादन प्रक्रियेत एका सेकंदाच्या आत ठरावीक बाजुने मशीनमधुन तो पार्ट बांधणीमधे येणे आवश्यक होते. असलेल्या मोज मापांमधे एक शतांशाचा पण फरक नको होता. ते काम अण्णाने घेतले. त्याचा मोल्ड बनवायला घेतला. मालाचा दर्जा उत्कृष्ट हवा असल्यामुळे सुरवातीस माल पास होईपर्यंत सहा महिने लागले. ही एक प्रकारे अण्णाची परिक्षाच होती. पण त्यात यशस्वी झाला. हे काम पण अण्णाने वांगना प्लॅस्टीकला दिले.

अशा रितिने अण्णाचे स्वतःच्या गांवी कारखाना काढायचे लहानपणापासूनचे जे एक स्वप्न होते ते पुरे झाले.

## हिंमते मर्दा

## पंधरा

तडवळेसारख्या आडबाजुच्या गावांत कारखाना उभारण्याचे धाडस अण्णाने केले खरे. आता हे युनिट यशस्वी करून दाखवण्याची जबाबदारी अण्णावर येऊन पडली होती. त्यासाठी वांगना प्लॅस्टीकला भरपुर काम मिळणे आवश्यक होते. तसेच ते युनिट चालवण्यासाठी योग्य व भरवशाची माणसे मिळणे पण तेवढेच महत्वाचे होते. वांगना प्लॅस्टीक हे युनिट अण्णाचे सर्वस्व बनले होते. या युनिटसाठी अण्णाला किती त्रास सहन करावा लागला, किती अपमान सोसावे लागले, किती द्वेष सहन करावा लागला. पण काहिही झाले तरी हे युनिट यशस्वी करून दाखवायचेच असा चंगच अण्णाने बांधला होता.

या युनिटसाठी कामे आणायला अण्णा बाहेर पडला आणि लाखो रुपयाची कामे त्याच्या झोळीत पडली. पहिल्या वर्षी 9 लाख रुपयांचे काम करणारे हे युनिट पुढे वर्षाला 50 लाख रुपयांची कामे करु लागले. पहिल्यापासूनच अण्णाने हे युनिट प्रॉफीटमधे चालवून दाखवले. तेथे असलेल्या दोन्ही प्लॅस्टीक मोल्डींग मशिन्सना 24 तास चालु रहातील एवढी कामे मिळत गेली. काम नाही किंवा रॉ मटेरीयल नाही म्हणून ती मशीन्स तासभरसुद्धा बंद ठेवण्याची पाळी कधी अण्णावर आली नाही. अण्णाला तेथे प्रामाणिकपणाने काम करणारे कामगार मिळाले. तिथे वॉचमन हा प्रकार नव्हता. कामगारच सगळी व्यवस्था बघत होते. ते आपापसात पाळ्या वाटून घेत असत. रॉ मटेरीयलचा व्यवस्थित हिशोब ठेवत असत. अण्णाने त्यांच्यावर संपुर्ण विश्वास टाकला होता तो त्यांनी सार्थ ठरवला. त्यामुळे अण्णाला तिथे फारसे काही बघावे लागायचे नाही. त्यामुळे कधीतरी पंधरा दिवसांनी तेथे अण्णाची चक्कर असायची. कामगार चुकले तर अण्णा त्यांना बोलायचा, रागवायचा. पण त्यांच्या अडचणीच्यावेळी त्यांच्या मदतीला धाऊन पण जायचा. तसेच अण्णाची सगळयांनाच समानतेची वागणुक

असायची. त्यामुळे कामगारांना अण्णा घरचाच वाटायचा. बबन भिसे हा तेथील एक कामगार तसेच मॅनेजरसुद्धा. तो अण्णाला म्हणायचा की तुम्ही मला हाकलून लावलंत तरी जाणार नाही. या युनिटने अण्णाला सुबत्ता मिळवून दिली. एम.एस.एफ.सी चे 5 वर्षांच्या मुदतीचे घेतलेले कर्ज अण्णाने तीन वर्षातच फेडून टाकले. आपण जर कामगारांवर विश्वास टाकला. त्यांना सन्मानाने वागवले. त्यांच्या चुका सांगण्याबरोबरच त्यांच्या चांगल्या कामाची प्रशंसा केली. त्यांच्या अडीअडचणीला धाऊन गेले. तर हेच कामगार उत्तम आणि प्रामाणिकपणे काम करतात. त्यांची उत्पादकता वाढते. ते आपल्यासाठी काहिही करायला तयार असतात हा महत्वाचा धडा अण्णा वांगना प्लॅस्टीकमुळे शिकला.

अण्णाने पेपरमधे बातमी वाचली की महाराष्ट्रातून जिल्हावार लघुउद्योगांना पुरस्कार देण्यात येणार आहेत. त्यासाठी ठरावीक नमुन्यात अर्ज जिल्हा उद्योग केंद्राकडे करायचे आहेत. अण्णाच्या मनात सहज विचार आला की वांगना प्लॅस्टीकसाठी म्हणून अर्ज करावा. पण त्याचे दुसरे मन त्याला सांगत होते की वांगना प्लॅस्टीक हे छोटे युनिट आहे. त्यात नाविन्य असे काही त्याला दिसेना. पण आपल्याला वाटेल ते दुसऱ्याला वाटेलच असे नाही. अण्णा सातारच्या जिल्हा उद्योग केंद्रातून फॉर्म घेऊन आला. तो प्रथम बारकाइने वाचला. सगळी कागदपत्रे जोडली व फॉर्म नेऊन दिला. पण इतर कामाच्या गडबडीत अण्णा हे पुर्ण विसरून गेला. एकदा सहज आठवण आली. पण ज्याअर्थी अजून काही कळले नाही त्याअर्थी दुसऱ्या कोणीतरी नंबर पटकावला असावा असे अण्णाला वाटले.

अचानक महाराष्ट्र शासनाच्या उद्योग संचालनालयाचे महाव्यवस्थापक अण्णाच्या गांवी अभीनंदन करण्यासाठी आले. अण्णा संध्याकाळी पुण्याला घरी टी.व्ही. पहात बसला होता. त्यांनी तडवळयाहून फोन करून अण्णाच्या वांगना प्लॅस्टीकला प्रथम पुरस्कार मिळाल्याची बातमी सांगितली. अण्णाला सुखद आश्चर्याचा धक्काच बसला. प्रथम अण्णाचा विश्वासच बसेना. कारण आपल्यापेक्षा हुशार, आर्थिक सुबत्ता असलेले लोक आहेत. कितीतरी मोठ्या कंपन्या आहेत याची त्याला जाणीव होती. या कंपन्यांशी स्पर्धा करून वांगना प्लॅस्टीकने प्रथम पुरस्कार मिळविला ही गोष्ट फक्त अण्णासाठीच नव्हे तर त्याच्या गावच्या लोकांसाठीसुद्धा अत्यंत अभिमानास्पद अशीच होती. त्यामुळे अण्णा सुखावला. शाल, श्रीफळ, पुष्पगुच्छ व 5000 रुपये रोख असे पुरस्काराचे स्वरुप होते. दुसऱ्या दिवशी अण्णा सातारला गेला. तेथे महाव्यवस्थापक कांबळे साहेब अण्णाची वाटच बघत होते. त्यांनी अण्णाचे अभिनंदन केले. पुरस्कार मिळाल्याचे पत्र दिले. लगेच ते सगळे जण आकाशवाणीवर गेले. तेथे अण्णाची

दहा मिनिटांची मुलाखत रेकॉर्ड करण्यात आली. आपण खेडेगावात कारखाना काढण्याचे जे धाडस दाखवले आहे त्याला सरकारी पातळीवरून शाबासकिची थाप मिळाल्याचे पाहून अण्णाला भरून आले होते.

29 जुलै 1996 हा अण्णाच्या जीवनातील अविस्मरणीय दिवस आहे. जे.आर.डी. टाटा यांच्या जन्मदिवसाचे औचित्य साधुन पुण्याच्या बाल गंधर्व रंगमंदिरात आयोजीत केलेल्या खास समारंभात महाराष्ट्राचे त्या वेळचे गव्हर्नर डॉ.पी.सी. अलेक्झांडर यांचे हस्ते अण्णाचा गौरव करून त्याला हे पारितोषिक देण्यात आले..

बाल गंधर्व रंगमंदिराबद्दल अण्णाला पहिल्यापासूनच आपुलकी आहे. अण्णा कॉलेजमधे असताना या रंगमंदिराचे बांधकाम त्याच्या डोळयादेखत झाले आहे. तसेच हे बांधकाम करणारे बी.जी.शिर्के पण सातारा जिल्ह्यातलेच. बाल गंधर्व रंगमंदीर पुण्याची शान समजली जायची. हे पुण्याच्या मध्यवर्ती ठिकाणी आहे. आजसुद्धा तिच शान समजली जाते. तर अशा या वास्तुत आपला सत्कार होतो आहे याचेच अण्णाला अप्रूप वाटत होते. अजून अण्णाने या समारंभाबद्दल कोणाला सांगितले नव्हते. पण वर्तमानपत्रात या कर्यक्रमाविषयी बातमी प्रसिद्ध झाल्यावर दिवसभर अण्णाला अभिनंदनाचे फोन येत होते. गावांतील माणसे तर या समारंभाला उपस्थित होतीच पण सातारा जिल्ह्यातील लोकांची हजेरी सर्वात जास्त होती. रंगमंदीर माणसांनी फुलून गेले होते. निम्मे रंगमंदीर तर सफेद पोषाख व सफेद टोप्यांनी भरले होते. सातारा जिल्ह्यातील लोकांसाठी हा एक अभिमानाचा क्षण होता. कारण असे पारितोषिक सातारा जिल्ह्याला पहिल्यांदाच मिळत होते. डॉ. पी.सी. अलेक्झांडर यांचे हस्ते पारितोषिक घेताना अण्णाच्या मनात अनेक आठवणी दाटून आल्या होत्या. हे पारितोषिक एका लघुउद्योजकाला मिळाले आहे. तेसुद्धा एका छोट्याश्या खेड्यातील माणसाला. त्यामुळे हे पारितोषिक माझे एकट्याचे नाही तर आख्या तडवळे गावाचे आहे. त्यांच्या शुभेच्छा, आशिर्वाद व प्रोत्साहन यामुळे हे यश प्राप्त होऊ शकले असे अण्णाने त्याच्या छोट्याशा भाषणात सांगितले. थोडक्यात अण्णाचा आपल्या गावी कारखाना काढायचा प्रयोग कमालीचा यशस्वी झाला होता.

पण Man proposes and god disposes अशी एक म्हण आहे. माणूस ठरवतो एक पण देवाच्या मनात काहीतरी वेगळेच असते याचा प्रत्यय अण्णाला येऊ लागला. महाराष्ट्रात विजेचा दुष्काळ सुरु झाला. विजेचे हे दुर्भीक्ष दिवसें दिवस वाढतच चालले.

भारनियमनासारखे प्रकार सुरु झाले. कोण्या एकेकाळी महाराष्ट्र राज्य वीज निर्मितीत देशातील आघाडीचे राज्य म्हणून ओळखले जायचे. राज्यातील विजेची गरज भागवून हे राज्य इतर राज्यांना वीज देत असे. पण उलटी गंगा सुरु झाली. महाराष्ट्र राज्यावर इतर राज्यातून वीज घेण्याची पाळी आली. तासंतास वीज गायब राहु लागली. याचा सर्वात कोठा फटका ग्रामीण भागाला बसला. अण्णाच्या गावाला पण याचा फटका बसला. अण्णाच्या गावात बारा बारा तास वीज गायब राहु लागली. वांगना प्लॅस्टीकच्या उत्पादन क्षमतेवर याचा परिणाम होऊ लागला. ऑर्डर असून, रॉ मटेरीयल असून, मशीन्स असून, कामगार असूनही अण्णाला वेळेवर ऑर्डर्स पुऱ्या करून देणे कठीण जाऊ लागले. वीज नसल्यामुळे कामगारांना बसून रहावे लागत होते. परिस्थितीत सुधारणा होईल यासाठी अण्णाने बरीच वाट पाहिली. पण परिस्थिती सुधारण्याचे काही चिन्ह दिसेना. परिस्थिती आणखीनच बिकट होऊ लागली. मग अगदी नाइलाजाने अण्णाला हे युनिट बंद करायचा निर्णय घ्यावा लागला. हा निर्णय घेताना अण्णाला खुप वाईट वाटले. मनाला खुप यातना झाल्या. महाराष्ट्र सरकारने पारितोषिक देऊन गौरवलेले हे युनिट अखेर विजेच्या समस्येमुळे बंद करण्याची पाळी आली. वांगना प्लॅस्टीक हे अण्णाचे ' बिगेस्ट सक्सेस' तर महाराष्ट्र सरकारचे ' बिगेस्ट फेल्युअर' पण ठरले.

ज्यावेळी सरकार लोकांना खेडेगावात उद्योग उभारा, कारखाने काढा म्हणून आवाहन करते तेव्हा त्या लोकांना लागणारी जमीन, वीज, पणी मिळण्याची सुविधा उपलब्ध आहे किंवा नाही याची खात्री सरकारने करून घ्यायला हवी. तसेच या लोकांना जमीन अधिग्रहण करण्यामधे, वित्त पुरवठा मिळण्यामधे काही अडचणी येणार नाहीत याची काळजी सरकारने घ्यायला हवी. सरकारची व सर्व संबंधीत सरकारी खात्याची धोरणे यासाठी अनुकुल व पुरक असावीत. बिगर शेती जमिनीच्या प्रमाणपत्रासारख्या जाचक अटी नसाव्यात. सरकारमधील बहुतेक मंत्री ग्रामीण भागातून आले आहेत. त्यांना ग्रामीण भागातील समस्यांची चांगली जाण आहे. त्यामुळे तेच अशी पुरक धोरणे बनवु शकतात. नाहीतर सरकारी घोषणा या नुसत्याच पोकळ घोषणा ठरतात. अण्णाचे हे अनुभवाचे बोल आहेत.

## हिंमते मर्दा

## सोळा

वाइटातून काहीतरी चांगले निघते असे म्हणतात. निदान अण्णाच्या बाबतीत तरी ही गोष्ट नेहमीच खरी ठरत आली आहे. एकीकडे काहीतरी वाईट घडत असते तेव्हा दुसरीकडे काहीतरी चांगले घडत असते. माणसाच्या आयुष्यात जर एखादी चांगली गोष्ट घडायची असेल तर कोणी कितीही अडथळे आणायचा प्रयत्न केला तरी ती गोष्ट घडल्याशिवाय रहात नाही. केलेले कष्ट, घेतलेली मेहनत, केलेली धावपळ, केलेला स्ट्रगल कधीच वाया जात नाही. याचे कधी ना कधीतरी फळ हे मिळतेच मिळते हा अण्णाचा अनुभव आहे. फक्त अण्णाच्या आयुष्यात जरी एखादी चांगली गोष्ट घडायची असली तरी ती साधी, सरळ, सोप्या मार्गाने कधीच घडत नाही. यामधेसुद्धा अडथळे, समस्या, संकटे येतच असतात. मनस्ताप होतच असतो. पेशन्स ठेवला तरच या गोष्टी मिळतात. अण्णामधे पेशन्स भरपुर आहे. अण्णाच्या प्रगतीचे हे पण एक प्रमुख कारण असले पाहिजे.

एक दार बंद झाले की दुसरे दार आपोआप उघडते असे म्हणतात. वांगना प्लॅस्टीकचे दार बंद होत असताना सातारला युनिट काढायच्या संधीचे दार उघडले जात होते.

अण्णा पुण्याहून तळवडेला जाताना नेहमी सातारमार्गे जात असे. त्यावेळी सातारला पण आपले एखादे युनिट असावे असे अण्णाला वाटत असे. कारण किती झाले तरी सातारा हे जिल्ह्याचे मुख्य ठिकाण आहे. तळवडेपासून ते फार दूर नाही. सातारला पण एम.आय.डी.सी. झालेली आहे. फक्त अण्णाला संधी मिळत नव्हती पण ती संधी अचानक चालून आली.

एक दिवस अण्णाला एम.एस.एफ.सी. च्या सातारा ऑफीसचे ब्रँच मॅनेजर पवार साहेबांचा फोन आला. 'तुम्ही उद्या सातारच्या ऑफीसमधे या. मला तुमच्याशी काही महत्वाचे बोलायचे आहे.' त्यांनी सांगितले. अण्णाला त्यांच्या बोलण्याचा बोध काही झाला नाही. दुसऱ्या दिवशी अण्णाला काही महत्वाच्या कामाला मुंबईला जायचे होते. अण्णाने त्याचा मुंबईचा दौरा

रद्द करून दुसऱ्या दिवशी सकाळी साडे दहा वाजता एम. एस. एफ. सी. चे सातारा ऑफीस गाठले. पवार नुकतेच ऑफीसमधे आले होते. त्यांनी अण्णाला पाहिले होते. पण अर्धा तास झाला तरी त्यांनी अण्णाला बोलावले नाही. त्यामुळे अण्णा चक्रावून गेला होता. आपले काही चुकले तर नाही ना अशी शंकेची पाल त्याच्या मनात चुकचुकत होती. पण तसे काही नव्हते. त्यांनी अण्णाला केबीनमधे बोलावले. उशिरा आत बोलावल्याबद्दल माफी मागीतली आणि म्हणाले, “ बोराटे! जी 33 एम. आय. डी.सी. सातारा येथील पॉली रोप नावाचे युनिट आम्ही विकायला काढले आहे. ते तुम्हाला घेता येत असेल तर अवश्य घ्या. त्यात तुमचा फायदा होईल. मी खरात साहेबांशी कोल्हापुरला तुमच्याबद्दल बोललो आहे. यासाठी तुम्हीच लायक आहात.”

खरात साहेब त्या वेळी कोल्हापुरला रीजनल मॅनेजर होते. वांगना प्लॅस्टीकच्या निमित्ताने अण्णाचा त्यांच्या कोल्हापुर ऑफीसशी संबंध आला होता. तेथील लोक अण्णाला ओळखत होते. तसेच वांगना प्लॅस्टीकचे कर्ज अण्णाने मुदतीच्या बरेच आधी फेडल्यामुळे त्यांचा अण्णावर विश्वास बसला होता. “तुम्ही आजच प्लॉट, ईमारत व आत असलेली मशीनरी पाहून या व उद्याच कोल्हापुरला जाऊन या.”पवार म्हणाले. लगेच त्यांनी बर्गे नावाच्या ऑफीसरला अण्णाबरोबर पाठवले. अण्णाने लगेच साईटवर जाऊन पहाणी केली. तेथे एक वॉचमन राखणीला होता. 29000 चौ. फुटांच्या प्लॉटवर 1800 चौ. फुटांची इमारत होती. पाण्याचे आणि लाईटचे कनेक्शन तोडलेले होते. आत भरपुर मशीनरी होती. हा प्लॅन्ट मोनो फिलॅमेन्ट बनवण्याचा होता. याच्यापासून मासेमारीसाठी जी जाळी लागतात ती बनवता येतात. शिवाय ज्याला आपण नॉयलॉनची दोरी म्हणतो ती पण तेथेच बनवली जात होती. आतील मशीनरी उत्तम दर्जाची होती. त्याची तेव्हाची किंमत 15 लाख रुपये होती. अण्णा त्या दिवशी रात्री तळवड्याला मुक्कामाला गेला. दुसऱ्या दिवशी आपल्या राम झांजुर्णे नांवाच्या मित्राबरोबर कोल्हापुरला गेला व खरात साहेबांना भेटला. खरात साहेब अण्णाला म्हणाले की तुम्ही योग्य किंमत दिलीत तर हे युनिट तुम्हाला मिळू शकेल व ते तुम्ही निश्चीत चालवाल. आम्हाला हे युनिट बंद झालेले नको आहे. त्याचा धंद्यासाठी वापर व्यायला हवा. अण्णा सहज बोलून गेला, ‘मी पाच लाख रुपये देतो. त्यात जागा, मशीनरी, ईमारत सर्व यायला हवे.’ खरात साहेबांनी अण्णाला तशी लेखी मागणी करायला सांगितली.

अण्णा संध्याकाळी पुण्याला परत आला व झालेला वृत्तांत रत्नमाला वहिनींना व उत्तमला सांगितला. पण रत्नमाला वहिनी यासाठी काही फारशा तयार दिसत नव्हत्या. त्यांचे म्हणणे होते की आधीच अण्णाची धावपळ चालु आहे. त्याला दुपारी दोन दोन वाजेपर्यंत

जेवायला वेळ मिळत नाही. एव्हडा पैसा कशाकरता कमवायचा? मुलींची लग्ने साध्या पद्धतीने करु. युवराज अजून लहान आहे. पण अण्णाचे म्हणणे होते की तो काही पैसा त्याच्या एकट्यासाठी कमवत नव्हता. एखादा उद्योग काढणे म्हणजे त्या क्षेत्रातील कर्तव्य पार पाडणे होय. हा एक सेवेचाच भाग आहे. अण्णाकडे यश उशिरा पण हमखास येतं असा त्याचा अनुभव आहे. दुसऱ्या दिवशी अण्णाने एम.एस.एफ.सी. च्या नावाने पाच हजार रुपयांचा डिमांड ड्राफ्ट काढला, साध्या पेपरवर वहिनींच्या व उत्तमच्या नांवाने दरपत्रक तयार करून कुरीयरने कोल्हापुरला पाठवून दिले. त्यानंतर अण्णाला कळले या आधी पेपरमधे दोन वेळा निविदा आल्या होत्या पण मनासारखी बोली आली नव्हती.

अण्णाने पंधरा दिवस वाट पाहिली. पण काहीच कळले नाही तेव्हा त्याने शेवटी कोल्हापुरला फोन केला. 'तुम्ही विहित नमुन्यात अर्ज केलेला नाही. शिवाय दैनिक पुढारीला अमक्यादिवशी विक्रिची जाहिरात दिली आहे. तुम्हाला तुमचा पांच हजरांचा डी.डी. परत पाठवत आहोत' असे अण्णाला उत्तर मिळाले. नंतर विहित नमुन्याचे फॉर्मस सातारहून आणले. अण्णा जी बोली बोलणार होता त्याच्या 5% प्रमाणे पंचवीस हजार रुपयांचा डी.डी व पांचशे रुपयांचा वेगळा डी.डी. काढला. फॉर्म व्यवस्थित भरला. तो ज्या दिवशी सर्वांसमोर उघडला जाणार होता त्या दिवशी दोन तास आधीच कोल्हापुरच्या ऑफीसमधे जाऊन निविदा पेटीत अण्णाने नेऊन टाकला व वाट बघत बसला. त्या दिवशी या युनिटची मागणी करणारे फक्त चौघेजण होते. अण्णाची बोली सर्वात जास्त म्हणजे पांच लाख रुपयांची होती. त्यामुळे अण्णाला वाटले की हे युनिट निश्चीत मिळणार. अण्णा सहज बोलून गेला होता की तो साताऱ्याला पण युनिट सुरु करतो आहे. पण जेव्हा 10 दिवसांनी अण्णाला वाटाघटिंना या असे एम.एस.एफ.सी. चे पत्र आले तेव्हा अण्णाला आश्चर्य वाटले व थोडासा राग पण आला. तुम्ही जर टेन्डर काढून विक्री करता मग ज्याचे टेन्डर जास्त रकमेचे आहे त्याला सरळ युनिट द्यायला हवे. यात वाटघाटिंचा संबंध येतो कुठे?

तरी पण अण्णाने जायचे ठरवले. कारण त्यांच्या नियमांपुढे अण्णाचे काही चालणार नव्हते. तसेच जर आपण गेलो नाही तर आपल्यापेक्षा कमी किंमत कोट करणाऱ्याला ते युनिट वीकले जाईल अशी भिती अण्णाला वाटत होती. वाटाघाटिला फक्त दोघांनाच बोलावले होते. अण्णा आणि सातारची एक पार्टी होती. त्यांची बोली तीन लाख वीस हजारांची होती. सातारची पार्टी सातारचे उद्योग धंद्यातील नावाजलेले गृहस्थ होते. ते गृहस्थ अण्णाला बाहेरच भेटले. त्यांचा एम.एस.एफ.सी. च्या कोल्हापुर ऑफीसमधे चांगलाच वचक असावा असे

अण्णाला वाटले. त्यामुळे अण्णा थोडा घाबरला. त्या गृहस्थांसमोर आपला टिकाव लागणार नाही असे त्याला वाटले. त्यांनी अण्णाला बोलावून घेतले. 'मी तुम्हाला मोफत प्लॉट देतो. तुम्ही अंग काढून घ्या.' म्हणून अण्णाला प्रलोभन दाखवु लागले. अण्णाच्या साध्या व बावळया वेशाकडे बघून त्यांना वाटले की हा एक साधा मराठी माणूस आहे. हा आपल्या प्रलोभनाला सहज बळी पडेल. परंतु ज्या ज्या लोकांनी आतापर्यंत अण्णाला अंडर एस्टिमेट केले आहे त्या सर्वांना त्याने त्यांची खरी जागा दाखवून दिली आहे. अण्णाने साफ नकार दिला. वाटाघाटीच्या टेबलावर एम.एस.एफ.सी.चे ऑफीसर व हे दोघे होते. सातारचे गृहस्थ पांच लाख दहा हजार बोलले कारण अण्णाची बोली पांच लाखाची होती. थोडक्यात लिलावाला सुरवात झाली होती. ते टेन्डर हे एक थोतांड होते. निदान एम.एस.एफ सी. सारख्या सरकारी नियंत्रण असलेल्या संस्थेकडून अशा प्रकारच्या व्यवहाराची अपेक्षा नव्हती. किंमत वाढत वाढत आठ लाखांच्या घरात गेली. अण्णाची अवस्था कात्रीत सापडल्यासारखी झाली. एकीकडे गावात बातमी फुटली होती की अण्णाने सातारला जागा घेतली. अण्णाला कारण नसताना हितशत्रु तयार होत होते. सातारची पार्टी ईरेला पेटली होती. माघार घ्यायला तयार नव्हती. जास्त किंमत बोलली तर ती पाळणे आवश्यक होते. सातारच्या पार्टीने आठ लाख तीस हजार किंमत कबुल केली. अण्णाने आठ लाख चाळीस हजारांची बोली लावल्यावर मात्र सातारच्या पार्टीने माघार घेतली. पण जे काही घडले ते काही अण्णाला फारसे आवडले नाही. सातारच्या पार्टीकडून माघार घेत असल्याचे लिहून घेण्यात आले. अण्णाकडून तो युनिट आठ लाख चाळीस हजार रुपयांना घेत असल्याचे लिहून घेण्यात आले. पुर्ण पैसे भरण्यासाठी अण्णाला 15 दिवसांची मुदत देण्यात आली. अण्णापुढे एवढे पैसे कसे गोळा करायचे हा यक्ष प्रश्न होता. पण तो सोडवण्यात अण्णा यशस्वी झाला व त्याने वेळेवर सगळे पैसे भरले.

अण्णाने ज्या अर्थी पुर्ण पैसे भरले त्या अर्थी युनिट त्याच्या मालकीचे झाले असे त्याला वाटले. पक्त सेल डीड करायचे राहिले होते. ते लवकर होईल असे अण्णाला वाटले म्हणून त्याने लगेच कामाला सुरवात केली. जी-33 या जागेत फक्त 1800 स्क्वेअर फुटांचे बांधकाम होते. त्याच्या चारी बाजुला कंपाऊंड नव्हते. साध्या, अत्यावश्यक अशा संडाससारख्या सुविधा नव्हत्या. त्या अण्णाला प्रथम कराव्याश्या वाटल्या. त्याने लगेच पुण्याहून गवंडी व मजुर आणले. त्यांना बाजुला झोपडी बांधुन दिली. प्लॉटच्या चारी बाजुला सहा फुटांची भिंत बांधायला घेतली. त्यासाठी वडील बंधु नानांची मदत घेतली. कारण त्यांना तळवड्याहून जाऊन कामावर देखरेख ठेवता येणे शक्य होणार होते. नंतर बाजुला ऑफीसला लागणारी

इमारत बांधायला काढली. तोपर्यंत अजून ताबा मिळालेला नव्हता. कारण कुठलेही काम सरळ झाले तर ते अण्णाचे नशीब कसले. यातही गुंतागुंत व्हायची होती.

सेल डीड साठी अण्णाचा लकडा चालुच होता. पण ते होत नव्हते. नुसत्याच निरनिराळया तारखा मिळत होत्या. अण्णा पार हैराण झाला होता. पैसे तर भरले होतेच शिवाय त्या जागेच्या डेव्हलपमेन्टसाठी तीन लाख रुपये खर्च झाले होते. शिवाय अण्णाची नामुश्की झाली असती ती वेगळीच. मधल्या काळात खरात साहेब जाऊन वैद्य साहेब रीजनल मॅनेजर म्हणून आले होते. त्यांना फोन करून काहीतरी पाणी मुरत आहे याची कल्पना दिली. पस्तीस हजार रुपयांचे स्टॅम्प पेपर घेऊन व स्वत:चा टायपीस्ट घेऊन अण्णा कोल्हापुरला गेला. तेथे त्याला कळले की आदल्याच दिवशी संध्याकाळी पांच वाजता कोर्टाचा स्टे आला आहे. ज्या पार्टीला लिलावातून माघार घ्यावी लागली तीच पार्टी अण्णाच्या मार्गात अडथळे आणत आहे. एम.एस.एफ.सी. च्या कोल्हापुर ऑफीसमधील कोणीतरी माणूस या पार्टीला घटनांची माहिती बरोबर देतो आहे हे अण्णाच्या लक्षात आले.

एकामागून एक येणाऱ्या संकटांनी अण्णा हतबल झाला होता. हे सर्व करण्यात त्याची चुक झाली आहे असे अण्णाला वाटु लागले होते. त्याची तब्येत पण त्यामुळे खराब होऊ लागली. पण पवार साहेब त्याला धीर देत होते. कोर्टाचा स्टे उठवण्यासाठी एम.एस.एफ.सी. ने प्रयत्न करणे गरजेचे होते. तेव्हडे काम करण्यासाठी, तेथील कोर्टाची माहिती काढण्यासाठी मग अण्णाला खास वकिलाची नेमणुक करावी लागली. तोपर्यंत एम.एस.एफ.सी. तर्फे कोर्टात स्टे उठवण्यासाठी अपील करण्यात आले त्यात अण्णाने पार्टी व्हायचे ठरवले. कारण एकतर एम.एस.एफ.सी.ही सेमी गव्हर्नमेन्ट वित्त संस्था आहे. त्यांचे धंद्यासाठीचे कर्ज जर एखादी पार्टी परत करत नसेल तर ते युनिट त्यांना 29-जी खाली ताब्यात घेण्याचा त्यांना अधिकार होता व त्या सेक्शनखाली त्यांनी ते ताब्यात घेतले होते. सर्व काही नियमानुसार होते. म्हणूनच अण्णाने या सगळ्या प्रकारात भाग घेतला होता. अण्णाच्या नशिबाने त्या दिवशी कोर्टाने स्टे उठवला. त्याने निकालाची प्रत मिळवून कॅव्हेट दाखल केले. अण्णा आता पुर्ण त्रासला होता. त्याने सरळ साताऱ्याहून वैद्य साहेबांना फोन केला. 'मला ताबडतोब खरेदी खत करून द्या नाहीतर मी तुमच्या ऑफीसमधे येऊन बसेन.' अण्णाने खडसावले. त्यांनी चार दिवसात खरेदीखत करून देण्याचे कबुल केले. सोमवारी तुम्ही सातारला या. काही अडचण आली तर मला फोन करा असे वैद्य साहेबांनी सांगितले. त्याप्रमाणे अण्णा सोमवारी सकाळी सातारला पोचला. पण पवार साहेबांचा पत्ता नव्हता. ते एक वाजता ऑफीसमधे आले. आज खरेदीखत होणार नाही. स्टे

विरुद्ध कोणी वरच्या कोर्टात अपील केले आहे का पहावे लागेल असे म्हणु लागले. अण्णाने सांगितले की त्याने कॅव्हेटसाठी अर्ज केला आहे त्यामुळे स्टे मिळणार नाही. पण पवार साहेब काही ऐकायला तयार होई नात. अण्णाच्या डोळयातून पाणी आले. पण अण्णाने स्वतःला सावरले. लगेच त्याने कोल्हापुरला फोन केला. वैद्यसाहेब बरोबर साडेतीन वाजता कोल्हापुरला आले व त्यांनी पुढाकार घेऊन चार दिवसात खरेदी खत करून दिले. शेवटी एकदाचा अण्णाला कायदेशीर अधिकार मिळाला पण बऱ्याच मोठ्या ‘लीगल बॅटल’ नंतर, की ज्याची खरोखरच काही आवश्यकता नव्हती.

एका आठवड्यात युनिटचा ताबा मिळाला. झाल्या प्रकाराचा राग अण्णाने मनात ठेवला नाही. कारण त्याला हे युनिट चालवायचे होते. सर्वानुमते युनिटचे नांव युवराज प्लॅस्ट्रिक इंडस्ट्री असे ठेवले. राहिलेले काम परत चालू केले कारण मधल्या काळात काम बंद ठेवावे लागले होते. एक महिन्यात रंग रंगोटी करून घेतली. भले मोठे गेट बनवून घेतले. आत जाण्यासाठी खडी टाकून व्यवस्थित रस्ता करून घेतला. वीस हजार लीटरची पाण्याची मोठी टाकी बसवून घेतली.

पण एवढे करूनसुद्धा अण्णाचे शुक्लकाष्ट अजून संपले नव्हते. पहिल्या पार्टीने बील भरले नाही म्हणून एमएसईबी ने वीज कनेक्शन तोडले होते. अण्णाने चौकशी केली तेव्हा त्याला कळले की पहिल्या पार्टीची दोन लाख रुपये बीजबिलाची थकबाकी होती. ती भरल्याशिवाय वीज कनेक्शन मीळाणार नव्हते. जर मिळालेच तर पहिल्या पार्टीच्या नांवाने मिळणार होते. ते काही एनओसी देणार नव्हते. अण्णाला काय करावे समजत नव्हते. त्याच्या मनाची चलबीचल सुरु झाली होती. सल्ला घेण्यासाठी अण्णा पुण्याच्या एम.एस.एफ.सी. ऑफीसमधे गेला. तेथे त्याला एक जी.आर. सापडला. एखाद्या पार्टीस एमएसएफसी ने मालमत्ता वीकली असेल व त्यास पुर्वीचे विजेचे कनेक्शन नको असेल तर पुर्वीच्या पार्टीचे राहिलेले पैसे न भरता नवीन कनेक्शन मिळविण्याचा अधिकार नवीन पार्टीस मिळतो. हे वाचून अण्णाला आनंद झाला. एक तर दोन लाख रुपये भरावे लागणार नव्हते. शिवाय नवीन कनेक्शन अण्णाच्या युनिटच्या नांवाने मिळणार होते. त्याने लगेच एमएसइबी चे सातारा ऑफीस गाठले. तेथे पवार म्हणून मुख्य अभीयंता होते. त्यांनी मदत करण्याचे वचन दिले. तरी पण वीज कनेक्शन मिळायला तीन महिने लागले. वीज चालु होइपर्यंत सतत तीन महिने अण्णाची तगमग चालु होती. शेवटी एकदाचे वीज कनेक्शन मिळाले आणि अण्णाचा जीव भांड्यात पडला.

अण्णाची कुठलीही सुरवात ही नेहमी धक्का स्टार्ट इंजीनच असते असा अण्णाचा अनुभव आहे. पण एकदा का ते इंजीन पळायला लागले की मग चांगला वेग पकडते. ससा आणि कासव यांच्या शर्यतीत ज्याप्रमाणे शेवटी कासवच जिंकते. त्याप्रमाणे शेवटी अण्णाचे हे धक्का स्टार्ट इंजीन जिंकतेच जिंकते असा अण्णाचा अनुभव आहे. सातारच्या या धक्का स्टार्ट युनिटचे पण तसेच झाले आहे. आता त्या युनिटने चांगले बाळसे धरले आहे. अण्णाने आता त्याची दोन युनीट्स केली आहेत. एक युनिट रत्नमाला वहिनींच्या नांवाने तर दुसरे युनिट उत्तमच्या नांवाने केले आहे. 250 केव्हीए कपॅसिटिचा ट्रान्सफॉर्मर इंस्टॉल केला आहे. जी जुनी इमारत होती त्यामधे युवराज प्लॅस्टीक इंडस्ट्रीज या नांवाने काम सुरु केले. राहिलेल्या 15000 चौ.फुट मोकळया जागेत 5000 चौ. फुटाचे नवीन बांधकाम करून त्यामधे जास्त कपॅसिटिच्या अत्याधुनीक प्लॅस्टीक मोल्डींग मशीन्स बसवण्यात आल्या आहेत. या युनिटचे नांव बोराटे प्लॅस्टीक पॅक इंडस्ट्रीज असे ठेवण्यात आले आहे. आज या युनिटमधे टाटा ग्रीन बॅटरी या रांजणगांवला असलेल्या प्रतिष्ठित कंपनीच्या बॅटरीसाठी लागणाऱ्या सगळया प्लॅस्टीकच्या पार्टसचे 90 टक्के उत्पादन या युनिटमधे होते. तसेच स्वयंपाक घरामधे लागणाऱ्या एक्सॉस्ट सिस्टीम ची निर्मिती करणाऱ्या फेबर या नावाजलेल्या कंपनीचे मुख्य उत्पादन पण येथेच होते. आज तेथे 40 च्या वर कामगार काम करीत आहेत. सातारची युनीट्स जरी रत्नमाला वहिनी व उत्तमच्या नांवावर असली, तरी अण्णाची दुसऱ्या क्रमांकाची मुलगी सुषमा जी सातारला असते, तिचे या युनिटसच्या व्यवस्थापनामधले योगदान महत्वाचे आहे.

हे युनिट सुरु करण्याआधी अण्णाला बराच त्रास झाला. पण तो त्रास सार्थकी ठरला. या युनिटमुळे अण्णाच्या शीरपेचांत अजून एक मानाचा तुरा खोवला गेला.

नुकतीच अण्णाने चाकणला दीड कोटी रुपये खर्चुन दीड एकर जमीन घेतली आहे व तेथे पांचवे युनिट टाकायच्या तयारिला सुरवात झाली आहे. ही अण्णाची पहिली प्रायव्हेट लिमिटेड कंपनी असणार आहे.

## हिंमते मर्दा

## सतरा

प्रगती करणाऱ्या मराठी माणसाला एक शाप नेहमीच भोवत आला आहे. तो म्हणजे इतरांबरोबरच आप्त स्वकियांचा द्वेष! एखादा मराठी माणूस प्रगती करु लागला की इतर मराठी माणसांच्या पोटात उगीचच दुखु लागते. यामधे कालांतराने आप्त, स्वकीय, जवळचे लोक पण केव्हा सामील होतात हे कळत पण नाही. आपण प्रगती करु शकत नाही या निराशेपोटी प्रगती करत असलेल्या मराठी माणसाकडे उगीचच शत्रुत्वाच्या भावनेने पाहिले जाते. त्याच्या प्रगतीत अडथळे कसे निर्माण करता येतील. त्याला कारण नसताना उगीचच मनस्ताप कसा देता येईल. त्याच्याकडून अव्वाच्या सव्वा अपेक्षा ठेऊन त्या त्याने पुर्ण केल्या नाहीत म्हणून त्याला दुषणे कशी देता येतील अशा प्राकारची अनिष्ट राजकारणे मग शिजु लागतात. पिढ्यान पिढ्या हा शाप मराठी माणसाला भोवत आला आहे. एकीत बळ असते यावर मराठी माणसाचा विश्वास नसावा असे वाटते. एकमेका करु सहाय्य, अवघे धरु सुपंथ ही म्हण आपल्यासाठी नसून इतरांसाठी आहे असा मराठी माणसाचा पक्का समज आहे. कोणीतरी मराठी माणसाला खेकड्यांची उपमा दिली आहे. कोळी लोक जेव्हा खेकडे पकडून टोपलीत घालून आणतात तेव्हा त्यांना टोपलिला झाकण घालावे लागत नाही. कारण जर एखादा खेकडा टोपली चढुन बाहेर पडायचा प्रयत्न करु लागला तर बाकिचे खेकडे त्याला खाली ओढत असतात. उद्योग व्यवसायाच्या क्षेत्रात मराठी माणसांमधली ही दुफळी स्पष्टपणे नजरेस येते. इतर जमातिंनी केवळ एकिच्या जोरावर उद्योग व्यवसायाच्या क्षेत्रात प्रगती करून आगळे वेगळे व आदरणीय स्थान निर्माण केले आहे. पण काही किरकोळ अपवाद वगळता मराठी माणसाला हे अजून जमलेले नाही. मराठी समाजात जेवढे घरभेदी, दुफळी माजवणारे, आप्त स्वकियांविरुद्ध कट कारस्थाने करणारी माणसे निर्माण झाली तेवढी इतर समाजात झालेली दिसत नाहीत. अण्णालासुद्धा याचा चांगला फटका बसला आहे.

अण्णाला तीन मोठे भाऊ. बहीण नाही. सर्वात मोठे बंधु केशव उर्फ दादा, दुसरे यशवंत उर्फ नाना व तीसरे महादेव उर्फ तात्या. लहानपणी सर्व भाऊ आनंदाने एकत्र रहात

होते. अण्णा सगळयात धाकटा. त्यामुळे या सर्वांचा त्याच्यावर जीव होता. वडिलांनी घरात शिक्षणाची परंपरा सुरु केली होती. पण अण्णाच्या वडील बंधुंना याचा फारसा लाभ घेता आला नाही. अण्णाने याचा पुर्ण लाभ घेतला व एम.एस्सी. पर्यंत शिक्षण पुर्ण केले. अण्णाच्या जडण घडणीमधे त्याच्या थोरल्या बंधुंचा पण मोठा वाटा आहे.

मोठे बंधु दादा लहानपणी पुष्कळ काम करीत. आपल घर पुढे आले पाहिजे असे त्यांना वाटे. त्यांनी शेतीची पुर्ण जबाबदारी घेतली. पहाटे चार वाजल्यापासून कामाला सुरवात करत. आपल्या शेतीतून येणारे उत्पन्न कमी पडते म्हणून दुसऱ्याची शेती खंडाने किंवा मेहेनतिने करत. शेतीचा त्यांना फार नाद. दुसऱ्याच्या विहिरीवरून मोट हाकून एक फर्लांग पाटाचे पाणी घेऊन जात. अण्णा कॉलेजला असताना ते सतत संपर्क ठेऊन असायचे. पंधरा दिवसांनी ते एकदा तरी अण्णाला भेटायला पुण्याला येत. बरोबर आईने केलेले गोडधोड किंवा ज्वारीची भाकरी व कालवणसुद्धा आणीत. अण्णाने जेव्हा स्वतःचा धंदा सुरु करायचा विचार सुरु केला तेव्हा त्यांनी नुसतीच संमती नाही तर प्रोत्साहन पण दिले. त्यांच्या मदतीने अण्णाने पेट्रोल पंप काढायचा प्रयत्न पण करून बघितला. पण त्यात अनंत अडचणी होत्या. शिवाय कमी फायद्याचा वाटला. म्हणून तो प्रयत्न सोडून दिला.

दादांना एकूण तीन मुले. एक मुलगा व दोन मुली. आता सर्वांची लग्ने झाली आहेत. त्यांच्या मुलाचे नांव सुर्यकांत. सगळे त्याला कांत म्हणतात. अण्णाने त्याला बारावी नंतर पुण्याला शिकायला आणले. त्याची कुवत बघून त्याला बी. ए. पर्यंत शिकवले. त्याला वाटु लागले की मार्केटींगचा डिप्लोमा करावा. अण्णाने त्याला संमती दिली. त्याचा डिप्लोमाचा खर्च पण अण्णानेच केला. त्याने डिल्पोमा पुर्ण केला. अण्णाला वाटु लागले की घरचा धंदा आहे. त्याने धंद्यात लक्ष घालावे. कामगारांकडून काम करून घ्यावे. येणाऱ्या जाणाऱ्यांबरोबर बोलावे. दोन एक वर्षे धंद्याचा अनुभव घ्यावा.

अण्णाने सुदर्शन केमिकलचे डॉ.राठी यांची मुलाखत टी.व्ही.वर पाहिली होती. ते स्वतः तर बारा बारा तास काम करायचेच पण त्यांच्या पुतण्यालाही बारा बारा तास कामगारांबरोबर काम करावे लागायचे. उद्योजक कसे घडतात किंवा घडवले जातात याची ही उदाहरणे अण्णाला समजु लागली होती. अजूनसुद्धा अण्णा असे कांही वाचनांत किंवा पहाण्यांत आले की घरांत सर्वांना सांगतो. हा मार्ग योग्य आहे याची जाणीव करून देतो.

आबासाहेब गरवारे जेव्हा मोटार धंद्यात होते तेव्हा सकाळी लवकर येऊन शोरुम स्वतः झाडायचे. शेठ वालचंद हिराचंद यांच्याबद्दल अण्णाला फारच जिव्हाळा वाटायचा.

अण्णाने त्यांच्याच शाळेत शिक्षण घेतले. शेठ वालचंद हिराचंद स्वतःच्या शर्टाची तुटलेली बटणे स्वतः लावायचे. त्यांचे कपडे पण अगदी साधे असायचे. त्यांनी कुठल्याही कामाची कधी लाज बाळगली नाही. सुप्रसिद्ध उद्योगपती शंतूनराव किर्लोस्कर यांनी सांगितलेला एक किस्सा मला आठवतो. ते जेव्हा अमेरिकेतून इंजिनीअरींग पुर्ण करून किर्लोस्करवाडीला परत आले तेव्हा त्यांच्या वडिलांनी, लक्षमणरावांनी, त्यांना एक उसाचा चरक बैलगाडीत घालून दिला. आणि जो पर्यंत तो चरक विकून त्याचे पैसे मिळत नाहीत तोपर्यंत वाडीला परत यायचे नाही म्हणून सांगितले. शंतूनरावांनी पण हा चॅलेन्ज स्विकारला. ते पंधरा दिवस उसाचा चरक असलेली बैलगाडी घेऊन किर्लोस्करवाडीच्या आजुबाजुच्या खेड्यात त्या चरकाचे प्रात्यक्षीक दाखवत फिरत होते. रात्री धर्मशाळेत किंवा देवळात मुक्काम ठोकत होते. जेव्हा तो चरक विकला गेला व त्याचे पैसे मिळाले तेव्हाच ते वाडीला परत आले. त्यांचे थोरले चिरंजीव चंद्रकांत किर्लोस्कर यांच्याविषयी पण असाच किस्सा आहे. ते जेव्हा अमेरिकेतून इजिनीअरींग करून परत आले तेव्हा शंतूनरावांनी त्यांना त्यांच्या खडकिच्या फॅक्टरीत एक वर्षे कामगारासारखे काम करायला लावले. ते रोज सायकलवर, कामगारासारखा मागे कॅरीयरला जेवणाचा डबा लावून फॅक्टरीत कामाला जात असत व कामगारांच्या मधे बसून, त्यांच्याबरोबर त्यांच्यासारखेच जेवण घेत असत. मालकाचा मुलगा म्हणून त्यांना कोणतीही स्पेशल ट्रीटमेन्ट नव्हती. इतकेच नव्हे तर त्यांना कामगारांविरुद्ध कोणत्याही प्रकारची तक्रार करण्यास मनाई हेती. कामगारांना मात्र त्यांच्या विरुद्ध तक्रारी करण्यास पुर्ण मुभा होती. धीरुभाई अंबानींबद्दल पण असाच एक किस्सा सांगतात. जेव्हा त्यांची दोन्ही मुले मुकेश व अनील अमेरिकेहून एम.बी.ए. करून आले तेव्हा धिरुभाईंनी त्यांना दोन दिवस एका खोलीत कोंडून ठेवले होते. या दोन दिवसांमधे रिलायन्स इंडस्ट्रीजने भविष्यकाळात काय करायला हवे याचे प्लॅनींग करायला सांगितले. उद्योजक हे असे घडत असतात.

अण्णाने कांतला आपल्या कारखान्यात काम करायला लावून त्याला उद्योजक म्हणून घडवायचा प्रयत्न करायला सुरवात केली. खरे म्हणजे त्याने बी.ए. झाल्यावरच फॅक्टरीत कामाला सुरवात करावी व काम करता करता शिकावे अशी अण्णाची इच्छा होती. अण्णाला कामगारांना पगार देता येत नव्हता म्हणून सकाळी सर्वां आगोदर उठून सर्व कंपनीसुद्धा झाडून घेत असे. स्वतःला काम करताना वेगळाच आनंद मिळत असे. म्हणून सुर्यकांतला तशा प्रकारचे वळण लावायचा प्रयत्न केला. पण त्याने हट्टाने मार्केटींगचा डिप्लोमा केला. त्यानंतर अण्णाने त्याला आपल्या फॅक्टरीत कामाला ठेऊन घेतले पण त्याची चाल वेगळी दिसु लागली. कामगारांबरोबर काम करण्याऐवजी तो मालकाचा पुतण्या म्हणून कामगारांचे योग्य व्यवस्थापन करु शकला नाही. त्याने कामात चुका केल्यावर अण्णा त्याला रागवत असे. ते

कांतला सहन होत नसे. म्हणून त्याने आपल्या वडिलांकडे अण्णाविरुद्ध खऱ्या खोट्या तक्रारी करायला सुरवात केली. मग ' तु माझ्या मुलाला उगीचच्या उगीच का रागावतोस?' म्हणून दादांनी अण्णालाच झापडायला सुरवात केली. हे कमी पडले म्हणून की काय त्यांनी माझ्या मुलाला स्वतंत्र युनिट काढून दे म्हणून त्यांनी अण्णावर प्रेशर आणायला सुरवात केली. कांतला अजून म्हणावा तेवढा अनुभव आलेला नाही. त्याला चांगला अनुभव आला की मग वेगळे युनिट काढु असे अण्णाने परोपकारिने सांगायचा प्रयत्न केला. पण त्याचा उपयोग झाला नाही. शेवटी त्यांनी अण्णाला भोसरीमधेच बोराटे इंडस्ट्रीज या नावाने वेगळे युनिट टाकायला लावले. त्यासाठी लागणाऱ्या कर्जासाठी अण्णाने आपल्या फॅक्टरीतील मशीनरी गहाण टाकली. मोठ्या थाटामाटात या युनिटचे उद्घाटन झाले. त्यावेळी अण्णाने आपल्या गावातील 200 माणसे पुण्याला आणली. आधी यामधे अण्णाची पंचवीस टक्के भागिदारी होती. पण पुढे अण्णाचा या युनिटशी काहिही संबंध नको म्हणून त्याला ही भागिदारी सोडायला लावली. कोणतेही नियोजन नसताना हे युनिट चालु करावे लागले. पहिल्यापासून कांतचे कामाकडे लक्ष नव्हतेच. आज ते युनिट नीट चालत नाही. हळु हळु ते सीक युनिट होण्याच्या दिशेने वाटचाल करत बंद झाले. बँकेने विक्रिची ऑर्डर केली. अण्णाने बँकेशी Compromise करून एक रक्कम ठरवून घेतली व सेटलमेंट केले. पुढे त्याने दुसऱ्या बँकेत जाऊन कर्ज काढले तरीसुद्धा त्याला युनिट चालवता येत नाही. जागा भाड्याने देऊन गुजराण करीत आहे. अण्णा बघूनही काही करु शकत नाही. पण त्यामुळे उगीचच दोन भावांमधे दुफळी निर्माण झाली आहे.

अण्णाचे दुसऱ्या नंबरचे थोरले भाऊ यशवंत उर्फ नाना. दादा शेतीच्या मोठ मोठ्या योजना आखायचे तर नाना त्याला विरोध करायचे. त्यांना सतत शंका वाटायची. ते शरिराने किरकोळ तरी काटक होते. धान्याने भरलेले पोते सहज उचलून घरी आणून टाकत असत. अण्णावर त्यांचा फार जीव. लहानपणी गावाबाहेर मुलांच्या कुस्त्यांचा फड लागत असे. त्यात नाना अण्णाची कुस्ती लावत असत. अण्णाने कुस्ती केली की त्यांना फार आनंद होई. अण्णाची तब्येत सुधारावी म्हणून ते उडदाची डाळ भीजवून व त्यात गुळ घालून सकाळच्या प्रहरी खायला देत. नाना नेहमी शेती कामात व्यस्त असत. अण्णाचे शिक्षण झाल्यावर मग मात्र त्यांनी बोलून दाखवले की आता तुझे पोट तुच भरले पाहिजेस. अर्थात अण्णाच्या दृष्टीने त्यांनी योग्य तेच सांगितले.

नानांना तीन मुले. त्यातील थोरला उत्तम. अण्णाने पाचवी नंतर उत्तमला पुण्याला शिक्षणासाठी म्हणून आणले व तो अण्णाच्या घरचाच झाला. अण्णाच्या मुलाचा, युवराजचा जन्म हाईपर्यंत लोक उत्तमलाच अण्णाचा मुलगा समजायचे. आपल्या कुवतीप्रमाणे

अण्णाने त्याला बी.कॉम. पर्यंत शिकवले व आपल्या फॅक्टरीतच कामाला लावले. उत्तमने पण या संधिचा चांगला फायदा करून घेतला. कामगारांमधे मिळून मीसळून वागून त्याने बरेच तांत्रिक ज्ञान मिळवले. फॅक्टरीतील मशीन्स तो स्वतः खोलून जोडु लागला. पुढे त्याने प्लॅस्टीक मोल्डींगसाठी लागणारे मोल्ड बनविण्याचे कौशल्य मिळवले. स्वतः अत्यंत अवघड असे प्लॅस्टीक मोल्ड डिझाईन करून व तयार करून अण्णाचे लाखो रुपये वाचवले. सुरवातीच्या काळात अण्णाला उत्तमची उत्तम साथ मिळाली. इंजिनीअरींगचे कोणतेही क्वालिफिकेशन नसताना उत्तमने उत्तम इंजिनीयर होऊन दाखवले. अण्णाने पण उत्तमला भरभरून दिले. चांगली मुलगी बघून त्याचे लग्न करून दिले. त्याला स्वतंत्र बंगला बांधुन दिला. सातारचे एक युनिट त्याच्या मालकीचे करून दिले. नानांची उरलेली दोन मुले फारसे शिक्षण घेऊ शकली नाहीत. अजूनही अण्णा अडी अडचणीला नानांच्या मदतीला धाऊन जात असे. पांच वर्षांपूर्वी नानांना असाध्य आजार झाला व त्यातच देव आज्ञा झाली. शेवटपर्यंत नानांचे व अण्णाचे संबंध चांगले राहीले.

अण्णाचे तीन नंबरचे भाऊ महादेव उर्फ तात्या. अण्णाचा लहानपणी त्यांच्याशी फारसा संबंध आला नाही. कारण वडिलांनी त्यांना कऱ्हाडच्या मिलीटरी बॉईज वसतीगृहात शिक्षणासाठी ठेवले होते. तिथे त्यांचे शिक्षण अर्धवट राहिले. पुढे ते कुपर इंजिनीयरींगमधे कामाला लागले. त्याना शिफ्टमधे काम करावे लागे. घरून जेवण नेता येत नसे. मग पुढे ते वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून मिलिटरीत भरती झाले व आर्मी मेडीकल कोअर मधे काम करु लागले. प्रत्येकाचा स्वभाव वेगवेगळा असतो. त्यांचा स्वभाव रागीट व तापट होता. कुपरमधे असताना ते सगळा पगार घरी देत असत. त्यामुळे घरात त्यांचा रुबाब चाले. त्यांना कोणी विचारत नसे. अण्णाला त्यांचा तापटपणाची झळ बसे. अण्णाने आईपेक्षा त्यांच्याच हातचा मार जास्त खाल्ला आहे. त्यामुळे पहिल्यापासूनच अण्णा त्यांना घाबरून असे.

पण या नाण्याला दुसरी बाजुही आहे. अण्णाच्या पुण्यामधील कॉलेज शिक्षणासाठी तात्यांनीच पुढाकार घेतला. त्यांच्यामुळेच अण्णाची कॉलेज शिक्षणाची वाट मोकळी झाली. त्यावेळी तात्यांचे पोस्टींग पण पुण्यालाच होते. त्यामुळे त्यांना पुण्याची सर्व माहिती होती. एम. ई. एस. कॉलेज, सदाचार वसतीगृह याची माहिती त्यांनीच काढली. अण्णाला कॉलेजमधे व वसतीगृहात ऍडमीशन मिळवून द्यायला त्यांनीच मदत केली. त्यांना महिना दीडशे रुपये पगार होता. त्यातून ते अण्णाला महिना शंभर रुपये देत असत. त्यामुळेच अण्णा पुण्याला राहु शकला. सदाचार वसतीगृहात आदल्या दिवशी राहिलेल्या पोळ्या दुसऱ्या दिवशी खाव्या लागत. त्यामुळे अण्णाचे पोट बीघडे. हे अण्णाने तात्यांना सांगितले. मग

तात्यांनीच अण्णाला महात्मा फुले वसती गृहात आणले. त्यावेळी वसतीगृहाचा खर्च महिना साठ रुपये होता. तात्या मद्रास, लखनौ, दिल्ली कुठेही बदली होऊन जात. पण दर महिन्याला न चुकता त्यांची मनाऑर्डर येत असे. अण्णाचे कपडे व्यवस्थित असावेत यावर त्यांचा काटक्ष असे. अण्णाने केस व्यवस्थित बसवले आहेत किंवा नाही हे ते समक्ष भेटल्यावर बघत. नाहीतर स्वतःच्या हाताने केस वींचरून देत. त्यांना वाटे की अण्णाने मिलीटरीत जावे, ऑफीसर व्हावे. त्यांनी एका उन्हाळयात अण्णाला अहमदनगरला ट्रेनींगलासुद्धा पाठवले होते. त्यांनी अण्णाला आय.ए.एस., आय.पी.एस. सारख्या उच्च दर्जाच्या स्पर्धात्मक परिक्षांचे फॉर्मस व पुस्तके पण आणून दिली होती. थोडक्यात अण्णाची सर्व बाजुने प्रगती व्हावी असा त्यांचा प्रयत्न होता.

तात्यांना दोन मुले. त्यातील एका मुलाला आठवीनंतर अण्णाने पुण्याला शिकायला आणले. तो बारावी झाल्यावर त्याला बारामतिच्या इंजिनीअरींग कॉलेजमधे ॲडमीशन मिळवून दिली. त्याचा पहिल्या वर्षाचा सगळा खर्च अण्णानेच केला. तात्या रिटायर होऊन आपल्या गावी स्थाइक झाले होते. तेथे अण्णा व तात्यांच्या वाट्याला गावातील जमीन आली होती. तेथे अण्णाने तात्यांच्या संमतीनेच दुमजली घर बांधले. निम्मे घर तात्यांना दिले. उरलेल्या आपल्या घराच्या हिश्शात अण्णाने तात्यांच्या संमतीनेच वांगना प्लॅस्टीकची स्थापना केली. पण कोणीतरी तात्यांचे कान फुंकले. तुमचा भाऊ मस्त गाडीतून फ़िरतो. त्याच्याकडे भरपुर पैसा आहे. तो श्रीमंत झाला. तुम्ही मात्र गरीबच राहिलात असे विचार कोणीतरी भरवून दिले. नंतरच्या काळात अण्णाला बराच त्रास झाला. जकात भरलेली असतानासुद्धा खोट्या तक्रारी केल्यामुळे जकात नाक्यावर अण्णाच्या गाड्या अडविण्याचे प्रकार सुरु झाले. अण्णा ज्यांची कामे करीत होता त्यांना कोणीतरी खोटी पत्रे पाठवली. त्यात अण्णाची व त्याच्या कंपनीची भरपुर बदनामी केलेली असे. तसेच एक्साईज, सेल्स टॅक्स, इन्कम टॅक्स या महत्वाच्या त्यामुळे त्यांनी दोन महिने अण्णाला कामच दिले नाही. या सगळयामागे तात्यांचा हात आहे हे अण्णा ओळखून होता. मग कामे मिळविण्यासाठी अण्णाला बरीच धावपळ करावी लागली. आपल्या कृतिमुळे आपण ज्याचे नुकसान आपण करीत आहोत तो आपलाच जीवलग, आप्त आहे हे तात्यांनी लक्षात घ्यायला हवे होते. आत्मचिंतन करायला हवे होते. पण तात्यांनी ते केले नाही याचे अण्णाला दुःख होते आहे. असे असूनही अण्णाने तात्यांशी असलेले संबंध चांगले रहावेत या दृष्टीने भरपुर प्रयत्न केले. पण त्याचा फारसा फायदा होऊ शकला नाही.

अशा रितिने भाऊबंदकीचा फटका अण्णाला बसलाच व याचा व्हायचा तो त्रास त्याला झालाच.

# हिंमते मर्दा

## अठरा

अत्यंत प्रतिकुल परिस्थितीत अण्णाच्या संसाराला सुरवात झाली. तीन वर्षे अण्णाच्या लग्नासाठी प्रयत्न चालु होते. पण मुलगा धंदा करतो, नोकरी करत नाही म्हणून अण्णाला मुलगी द्यायला कोणी तयार होत नव्हते. शेवटी B.A. D.Ed. झालेल्या रत्नमाला वहिनींचा होकार आला व अण्णाचे लग्न झाले. लग्न झाले तेव्हा रत्नमाला वहिनी हायस्कुल टीचर म्हणून नोकरी करत होत्या. आपल्या पोटा पाण्याची सोय व्हावी म्हणून अण्णाने त्यांना नोकरी सोडायला लावली व स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेतला. कारण अण्णाला इन्कम नव्हते तर रत्नमाला वहिनींचे येणारे हक्काचे इन्कम बंद झाले होते.

अक्षरशः तीन भांड्यांपासून संसाराला सुरवात करावी लागली. वेगळी जागा घ्यायला पैसे नाहीत म्हणून जंगलात असलेल्या फॅक्टरीत संसार थाटायची पाळी आली. अण्णाचा संसार या ठिकाणी एक दोन वर्षे नाही तर तब्बल पंचवीस वर्षे होता. अण्णाच्या चारही मुलांचा जन्म, वाढ, शिक्षण याच जागेत झाले. या संपुर्ण काळात अण्णाला रत्नमाला वहिनींची साथ कशी मिळते यावरच अण्णाच्या धंद्याचे यशापयश अवलंबुन असणार होते.

ज्याप्रमाणे कुठल्याही उद्योग व्यवसायाची पहिली काही वर्षे नाजुक असतात. त्याचप्रमाणे नवीन लग्नामधे पण पहिली काही वर्षे नाजुकच असतात. अण्णाच्या आयुष्यात धंद्याची व लग्नानंतरची नाजुक वर्षे एकदमच सुरु झाली होती. त्यामुळे अण्णाला एकाच वेळी दोन आघाड्यांवर लढायची पाळी आली होती.

कोणतीही मुलगी लग्न करून सासरी येते तेव्हा तिची आपल्या सासरविषयी व संसाराविषयी काही स्वप्ने असतात. त्यातूनही रत्नमाला वहिनींसारख्या नोकरी केलेल्या मुलीची

स्वप्ने तर आणखी वेगळी असू शकतात. संसाराची सुरवात दारिद्रयात झालेली आहे, आपल्या नवऱ्याला उत्पन्न काहिही नाही हे बघितल्यावर लगेच नोकरीचे विचार सुरु होतात. आपण नोकरी करावी किंवा आपल्या नवऱ्याला नोकरी करण्यास भाग पाडावे असे विचार लगेच सुरु होतात. जेव्हा एखादा माणूस उद्योग व्यवसाय सुरु करतो तेव्हा त्यांची एकट्याचीच मानसिकता उद्योग व्यवसायासाठी अनुकुल असून चालत नाही. त्याच्या संपुर्ण कुटुंबाची मानसिकता यासाठी अनुकुल लागते. जर उद्योग व्यवसाय करणारा पुरुष किंवा स्त्री विवाहीत असेल तर त्याला किंवा तिला पत्नीकडून व पतीकडून किती प्रमाणावर नैतीक पाठींबा मिळतो यावर बरेच काही अवलंबुन असते. याविषयी मला ठाऊक असलेली दोन उदाहरणे खाली देत आहे.

माझे एक स्नेही आहेत. ते हुशार इंजिनीयर आहेत. पुण्यातील एका नावाजलेल्या प्रतिष्ठित कारखान्यात त्यांनी बारा वर्षे नोकरी केली. नोकरीत चांगली प्रगती केली. त्यांना चांगला पगार मिळत होता. त्यांनी नोकरी सोडून स्वतःचा बिझिनेस चालु केला. त्यांचा बिझिनेस उत्तम चालला असता. पण बिझिनेसच्या सुरवातीच्या नाजुक पिरीयड मधे त्यांना त्यांच्या पत्नीचे म्हणावे तसे सहकार्य मिळाले नाही. चांगली नोकरी सोडून त्यांनी बिझिनेस सुरु केला म्हणून त्यांची पत्नी नाराजी दाखवत होती. घरी येणारे नियमित उत्पन्न बंद झाले होते. धंदा पण सुरवात असल्यामुळे नीट चालत नव्हता. त्यामुळे त्यांना त्यांच्या पत्नीच्या उपहासपुर्ण टिकेस नेहमी तोंड द्यावे लागे. शेवटी पत्नीच्या कटकटिला कंटाळून त्यांनी त्यांचा बिझिनेस विकून टाकला व सरळ नोकरीचा रस्ता पकडला. आज ज्या माणसाने त्यांचा बिझिनेस विकत घेतला आहे तो त्या बिझिनेसवर कोट्याधीश झाला आहे.( अर्थातच तो माणूस मराठी नाही.)

माझे दुसरे एक मित्र आहेत. त्यांच्या पत्नीला ते नोकरी करतात हे अजिबात मान्य नव्हते. आपल्या नवऱ्याने इतरांची हाजी हाजी करावी, इतरांकडे नोकर म्हणून काम करावे हे अजिबात पटत नव्हते. तिने पतीच्या मागे लागून नोकरी सोडून स्वतःचा बिझिनेस चालु करायला प्रवृत्त केले. वेळ आली तर मी मीठ भाकरी खाऊन राहीन पण मी तुम्हाला नोकरी करु देणार नाही असे तिने सांगितले. पत्नीच्या प्रोत्साहनाने माझ्या या मित्राने नोकरी सोडून स्वतःचा बिझिनेस सुरु करण्याचे धाडस केले. पत्नीचे त्याला पहिल्यापासून पुर्ण सहकार्य मिळाले. बिझिनेस सुरु केला तेव्हा त्याच्या दोन्ही मुली लहान होत्या. आधी घरातूनच बिझिनेसला सुरवात केली. मुलींचे करून जसा वेळ होईल त्याप्रामाणे पत्नी मदत करीत असे. आज त्याचा वर्षाला 20 कोटी रुपयांच्यावर टर्न ओव्हर असणारा बिझिनेस आहे. त्याच्याकडे

आज बंगला, गाडी सर्वकाही आहे. दोन्ही मुलींची उत्तम शिक्षण झाले असून दोघिही इंजिनीयर झाल्या असून परदेशात स्थायिक झाल्या आहेत. माझा मित्र त्याच्या या प्रगतीचे सर्व श्रेय आपल्या पत्नीला देतो.

अण्णाला सुरवातीच्या नाजुक पिरीयड मधे रत्नमाला वहिनींची खंबीर साथ मिळाली. या बाबतीत अण्णा स्वतःला फार सुदैवी समजतो. जर कटकट करणारी बायको असती तर अण्णाला केव्हाच गाशा गुंडाळावा लागला असता. गरिबीमधे कोंड्याचा मांडा करून संसार कसा करायचा हे जसे रत्नमाला वहिनींना ठाऊक होते तसेच त्यांचा अण्णावर पुर्ण विश्वास होता. त्या अण्णाची धावपळ, पळापळ, कष्ट आणि प्रामाणिक मेहनत बघत होत्या. नोकरी आणि धंदा यातील फरक पण त्यांनी जाणून घेतला होता. कष्ट आणि मेहेनत हे नोकरीतपण असतातच. पण नोकरीत त्याचे फळ मर्यादित प्रमाणात मिळत असते. परंतु धंद्यामधे याला काही मर्यादा नसते. एक वेळ अशी होती की त्यांच्या कारखान्यात काम करणाऱ्या कामगाराची आर्थिक परिस्थिती त्यांच्यापेक्षा चांगली होती. मुलींना दुध द्यायला किंवा चांगले कपडे घ्यायला पैसे नसायचे. पण त्यामुळे त्या खचून गेल्या नाहीत. त्यांचा विश्वास होता की एक ना एक दिवस अण्णाला यश हे नक्की मिळेल. त्यामुळे त्यांनी अण्णाला धंद्यासाठी पुर्णपणे मोकळे सोडले व संसाराची संपुर्ण जबाबदारी स्वतःच्या खांद्यावर घेतली. तसेच अण्णा नसताना फॅक्टरीची पण जबाबदारी संभाळण्याचे काम केले.

अण्णाच्या सर्वात मोठ्या मुलीचा शुभांगीचा जन्म 1976 साली झाला. दुसऱ्या मुलीचा सुषमाचा जन्म 1978 सालचा. तिसऱ्या मुलीचा दीपालिचा जन्म 1981 सालचा. तीन मुलींच्या जन्मानंतर खरे म्हणजे अण्णा फुल स्टॉप घेणार होता. पण त्यांना अजून एक पुत्ररत्न झाले व 1986 साली युवराजचा जन्म झाला.

अण्णाचे वडील फारसे शिकलेले नव्हते. त्याची आई तर अशिक्षीतच होती. पण दोघेही शिक्षणाचे महत्व ओळखून होते. आपल्या चारही मुलांना उत्तम शिक्षण घेण्याविषयी प्रोत्साहन देऊन त्यांनी त्यांच्या घरात शिक्षणाची परंपरा सुरु केली होती. अण्णाने हीच परंपरा पुढे चालु ठेवायचे ठरवले. अण्णाने शिक्षणाबरोबरच तंत्र शिक्षण व व्यावसायिक शिक्षणाचे महत्व ओळखले होते. या शिक्षणाची परंपरा सुरु करण्याचे अण्णाने ठरवले. अण्णाच्या मोठ्या मुलीने शुभांगीने इंडस्ट्रीयल इंजिनीयरींगमधील डिप्लोमा केला असून ती अण्णाच्या घराण्यातील पहिली महिला इंजिनीयर झाली आहे. दुसऱ्या मुलीने सुषमाने एम्. कॉम्. नंतर डी.बी.एम. करून अण्णाच्या घराण्यातील पहिली मॅनेजमेंट ग्रॅज्युएट झाली. दीपाली बी.ई.

इलेक्ट्रॉनिक्स होऊन पहिली महिला ग्रॅज्युएट इंजीनीयर झाली तर युवराज बी. ई. मेकॅनीकल झाला. अण्णाच्या चारही मुलांची लग्ने झाली असून त्याला जावई व सूनबाईसुद्धा तशाच मिळाल्या आहेत. शुभांगीचे पती ऍटोमोबाईल मधील डिप्लोमा होल्डर असून त्यांचे वाईच्या इंडस्ट्रीयल इस्टेटमधे स्वतःचे युनिट आहे. सुषमाचे मिस्टर बी.ए.एम.एस. डॉक्टर असून तिने सातारला स्वतःचा बॅटरिचा व्यवसाय सुरु केला आहे. दीपालिचे यजमान एम. ई. पॉलीमर इंजिनीयर असून दिपाली अण्णाला फॅक्टरीत मदत करीत आहे. युवराजच्या सौभाग्यवती बी.ई. इलेक्ट्रॉनिक्स असून त्या आता एम.बी.ए. करत आहेत. अशा रितीने अण्णाने आपल्या घरात उच्च तांत्रिक व व्यावसायिक शिक्षणाची परंपरा आणली आहे.

अण्णाने उच्च शिक्षणाची परंपरा फक्त आपल्या घरापुरतीच मर्यादित ठेवली नाही. ही परंपरा आपल्या भावांच्या मुलांसाठी म्हणजे आपल्या पुतण्यांसाठी पण अवलंबली. सुर्यकांत हा अण्णाच्या सर्वात थोरल्या बंधुंचा दादांचा मुलगा. अण्णाने त्याला अकरावीनंतर पुण्याला शिक्षणासाठी आणले. अभ्यासात हयगय होऊ नये म्हणून त्याला वसतिगृहात ठेवले. त्याने बी. ए. व पुढे एम.बी.ए. केले. उत्तम हा अण्णाच्या दुसऱ्या नंबरच्या थोरल्या बंधुंचा, नानांचा मुलगा. अण्णाने त्याला पाचवीत असतानाच पुण्याला शिकायला आणले. त्याने बी.कॉम. केले व पुढे अण्णाच्या फॅक्टरीतच अण्णाला सहय्यक म्हणून काम करु लागला व हुशार इंजिनीयर बनला. अण्णाचे तिसऱ्या नंबरचे थोरले बंधु तात्या. त्यांना दोन मुले. त्यांच्या एका मुलाला आठवीनंतर शिक्षणासाठी अण्णाने पुण्याला आणले. बारावीनंतर बारामतिच्या इंजिनीअरींग कॉलेजात त्याला प्रवेश मिळाला. त्याचा पहिल्या वर्षाचा खर्च अण्णानेच केला.

अण्णाच्या मुलांच्या शिक्षणाला जेव्हा सुरवात झाली त्या वेळी पुण्यामधे इंग्लीश मिडीयम स्कुलचे प्रस्थ वाढु लागले होते. त्यावेळी पुण्यात हाताच्या बोटावर मोजता येतील एवढीच इंग्लीश मिडीयम व कॉन्वेन्ट स्कुल्स होती. पण त्या वेळीसुद्धा आपल्या मुलांना कॉन्वेन्ट स्कुलमधे घालणे प्रतिष्ठेचे समजले जायचे. पुढे पुढे हे खुळ वाढत गेले. पुण्यात गल्ली बोळांत इंग्रजी माध्यमाच्या शाळांचे पीक निघाले. अनेक पालक या शाळांच्या फिया, डोनेशन्स परवडत नसतानासुद्धा, हट्टाने आपल्या मुलांना या शाळांमधे घालु लागले. आज तर परिस्थिती अशी आहे की इंग्लीश मिडीयम स्कुलमधे ऍडमीशन मिळणे मुश्कील झाले आहे तर मराठी माध्यमाच्या शाळा ओस पडू लागल्या आहेत. आपली मुले इंग्लीश मिडीयम मधे शीकली नाहीत तर आयुष्यात मागे पडतील अशी भिती प्रत्येक पालकाला वाटु लागली आहे.

इंग्लीश मिडीयम स्कुलच्या या जमान्यात अण्णाने मात्र त्याच्या सर्व मुलांचे शालेय शिक्षण मराठी माध्यमातूनच केले आहे. याचे कारण म्हणजे अण्णाला मराठी भाषेबद्दल नुसतेच प्रेम नाही तर जिव्हाळा व आदरसुद्धा आहे. त्याचे स्वतःचे शालेय शिक्षण मराठी माध्यमातून झाले. इंग्रजी कच्चे असल्यामुळे कॉलेजच्या पहिल्या वर्षी बोंबाबोंब झाली तेवढीच. पण त्यानंतर मराठी मिडीयम मधुन शिक्षण घेतले म्हणून आपण मागे पडलो असे अण्णाला कधी वाटले नाही. मनांत आले असते तर अण्णा त्याच्या सर्व मुलांचे शिक्षण इंग्लीश मिडीयम स्कुलमधुन करु शकला असता. पण अण्णाने जाणीवपुर्वक तसे केले नाही. अण्णाच्या मुलांनी पण याबद्दल कधी आक्षेप घेतला नाही.

शिक्षणामधे शाळेला फार महत्व असते. चांगल्या शाळांमधेच चांगले शिक्षक भेटतात हे अण्णाने ओळखले होते. चांगली शाळा, मग ती कितीही लांब असली तरी हरकत नाही हे त्याचे धोरण होते. अण्णाचे आठवीनंतरचे शिक्षण सातारा रोडच्या कुपर हायस्कुल मधे झाले होते. तेथेच त्याला जमदग्नी सरांसारखे उत्तम शिक्षक भेटले होते. त्यांच्यामुळेच अण्णाच्या मनांत गणिताविषयी गोडी निर्माण झाली होती. यासाठी अण्णाला रोज 10 किलोमीटर्सची पायपीट करावी लागत होती. अण्णाने आपल्या मुलांसाठी पुण्यातील मॉडर्न हायस्कुल ही शाळा निवडली. अण्णाच्या तीन मुलांचे, म्हणजे सुषमा, दीपाली व युवराजचे शिक्षण याच शाळेत झाले. ही शाळा अण्णाच्या घरापासून बरीच दूर म्हणजे 20 किलोमीटर लांब आहे. कारण अण्णाचे घर भोसरीला तर ही शाळा पुण्याच्या जंगली महाराज रोडवर. जायला यायला पी.एम.टी. बस शिवाय दुसरे साधन नाही. अण्णाच्या घराजवळचा पी.एम.टी. बसचा स्टॉप तसा घरापासून दूरच. पण अण्णाच्या मुलांनी बसमधुन एवढ्या दूरच्या शाळेत जाण्यासाठी कधी विरोध दर्शवला नाही. हल्लिच्या मुलांना पाच किलोमीटरवरील शाळेलासुद्धा रिक्षा किंवा स्कुल बस, व्हॅन लागते. तसेच मराठी मिडीयम मधुन शिक्षण झाले म्हणून अण्णाची मुले कोठे मागे पडली नाहीत. आपले शिक्षण मराठी मिडीयम मधुन झाले, इंग्लीश मिडीयम मधुन झाले नाही म्हणून आपण मागे पडू अशी भिती असणाऱ्यांना यातून बरेच काही शिकता येईल.

जसजशी परिस्थिती सुधारत गेली तसतशा अण्णाने आपल्या युनिटमधे पण लक्षणीय सुधारणा केल्या. पुर्वी अण्णाने जुनी मशीनरी विकत घेऊन सुरवात केली होती. पण टप्प्या टप्प्याने सर्व जुन्या मशीन्स काढून टाकून सगळया नवीन मशीन्स बसवल्या. आता अण्णा फक्त नवीन मशीन्सच घ्यायला लागला. याच्या मशीनची किंमत एक कोटी रुपयांच्या वर असते. आज त्याच्याकडे या क्षेत्रातील अत्याधुनिक मशीन्स आहेत. पुर्वी बॅटरिच्या केसींग

बनविण्यामधे त्याचा हातखंडा होता. आज ऍटोमोबाईलच्या क्षेत्रात मोल्डेड प्लॅस्टीकचा वापर वाढत चालला आहे. हल्ली बऱ्याच वाहनांवर मोल्डेड प्लॅस्टीकचे पार्टस मोठ्या प्रमाणावर दिसु लागले आहेत. पुणे हे आता ऍटोमोबाईल हब म्हणून ओळखले जाऊ लागले आहे. अण्णाने हा होत असलेला बदल आधीच ओळखला होता. आता अण्णाच्या फॅक्टरीत ऍटोमोबाईलला लागणाऱ्या मोल्डेड प्लॅस्टीक पार्टसचे उत्पादन मोठ्या प्रमाणावर होते.

उत्तमचे अण्णाला पहिल्यापासूनच उत्तम सहकार्य मिळत गेले आहे. दीपाली इंजिनीयर झाल्यावर अण्णाच्या बरोबरिने फॅक्टरीत काम करु लागली. अण्णाचा मुलगा युवराज बी.ई. मेकॅनीकल होण्या आधीपासूनच अण्णाच्या फॅक्टरीत काम करत होता. आता अण्णाच्या बिझिनेसची सुत्रे हळु हळु दुसऱ्या पिढीकडे म्हणजे युवराज व दीपालीकडे येत आहेत. दोघेही प्रचंड मेहेनत घेत आहेत. आपल्या इंजिनीअरींगच्या शिक्षणाचा पुर्ण उपयोग करून दोघांनीही बरीच नवीन व अत्याधुनीक तंत्रे यशस्वीपणे वापरायला सुरवात केली आहे. येत्या काही वर्षातच कंपनीचा टर्न ओव्हर वर्षाला 1000 कोटी रुपयांच्या वर नेण्याची त्यांची महत्वाकांक्षी योजना आहे. अण्णाने जसे बी पेरले तशी त्याला फळे मिळू लागली आहेत.

## हिंमते मर्दा

## एकोणीस

अण्णाचा जन्म गरिबीत झाला. गरिबीचे चटके खात खात अण्णा लहानाचा मोठा झाला. पुढे गरिबीची जागा स्ट्रगलने घेतली. अण्णाला व्यसनाधीन होण्यासाठी उत्कृष्ट पार्श्वभुमी होती. पण अण्णा सगळया प्रकारच्या व्यसनांपासून दूर राहिले. हे अण्णाला कसे जमले?

अनेक माणसे अनेक कारणांनी व्यसनांमधे स्वतःला अडकवून घेत असतात. कोणी गरिबीचे दुःख विसरण्यासाठी, कोणी झालेले अपमान विसरण्यासाठी, कोणी मनावरचे टेन्शन विसरण्यासाठी तर कोणी गंमत म्हणून व्यसनांना सुरवात करत असतात. विडी काडीच्या व्यसनापासून सुरवात होते. त्याचे सिगरेटच्या व्यसनात केव्हा रुपांतर होते समजत नाही. बीअरपासून ड्रींक्सच्या व्यसनाला सुरवात होते व मग पुढे माणूस अल्कोहोलच्या जाळयात केव्हा अडकतो त्याचे त्यालाच समजत नाही. अनेकजण आपल्या व्यसनांना प्रतिष्ठा पण देण्याचा प्रयत्न करताना दिसत असतात. व्यसन करणाऱ्या अनेक जणांना वाटत असते की ते व्यसनांचे गुलाम नाहीत. ते मनांत येईल तेव्हा केव्हाही व्यसन सोडु शकतात. पण प्रत्यक्षात तसे घडत नाही. मनावरचे टेन्शन दूर करण्यासाठी व्यसन हा एक प्रभावी उपाय होऊ शकतो हेच मान्य करायला अण्णासारखी माणसे तयार नसतात.

गरिबीत सुख कसे अनुभवायचे हे अण्णा आपल्या आईकडून शिकला. तसेच स्ट्रगलच्या दिवसांमधेसुद्धा आनंदाचे, विरंगुळयाचे क्षण कसे वेचायचे हे पण अण्णा शिकला. लहानपणी आई वडिलांनी केलेले संस्कार आणि आनंदाचे, विरंगुळयाचे क्षण वेचायची लागलेली

सवय! यामुळे अण्णाला कधी मनावरचे दुःख हलके करायला विडी, काडी, सिगारेट, तंबाखुची गरज भासली नाही की कधी दारुची बाटली जवळ कराविशी वाटली नाही. आयुष्यातील एवढे चढ उतार पाहूनसुद्धा अण्णा अजून संपुर्णपणे निर्व्यसनी आहे. अगदी सुपारिच्या खांडेचे पण व्यसन नाही. एव्हड्या तेव्हड्या कारणांवरून व्यसनाच्या जाळयात स्वतःला अडकवून घेणाऱ्या आजच्या तरुण पिढिला अण्णापासून बरेच काही शीकता येईल.

लहानपणापासूनच अण्णाचा त्याच्या गावाकडे ओढा आहे. या ना त्या रुपाने त्याने आपल्या गावाशी असलेले जिव्हाळयाचे संबंध जपून ठेवले आहेत. अण्णाच्या गावी त्याच्या लहानपणापासून सतत ज्ञानेश्वर माऊलिंची पारायणे होत आली आहेत. अण्णाला कधी याला जायचा योग आला नव्हता. पण एकदा पारायणाला जायचा योग जुळून आला. पारायणे सुरु झाली तेव्हा अण्णाच्या गावी ज्ञानेश्वर माऊलीचे मंदीर नव्हते. सुरवातीला साधा मंडप घालून पारायणाला सुरवात केली होती. पुढे गावकऱ्यांना मंदिराची गरज भासू लागली. मारुतीच्या मंदिरापुढे माऊलिंचे मंदीर बांधावे असे बापुंना वाटले. त्या प्रेरणेने त्यांनी दोन वर्षात मंदीर बांधले. त्यासाठी राजस्थानातून दगड आणले. कसबी कारागीर आणले. देणग्या मिळविण्यासाठी बापु सर्व महाराष्ट्रात फ़िरले. काहिंनी मदतीचा हात पुढे केला तर काहिंनी झीडकारले. मंदिरालगतच बहुउद्देशीय मंडप बांधला. पारायणाला आमदारांना आणून त्यांच्या आमदार फंडातून पैसे मिळवले. एक वर्षी अण्णाला व रत्नमाला वहिनींना अतिथी म्हणून बोलावले. त्यांच्या हस्ते ज्ञानेश्वर व विठ्ठल रखुमाईची पुजा झाली. त्यावेळी गावाच्या माऊली मंडळाकडे स्वतःची पेटी, पखवाज, टाळ नव्हते. ते दुसऱ्या गावाहून आणावे लागत. तेही खराब होते. ज्ञानेश्वरीच्या प्रती जिर्ण झाल्या होत्या. त्या अण्णाने माऊलिंच्या चरणी अर्पण करायचे ठरवले. शेवटचे चार दिवस अण्णा गावी थांबला. भक्तीरसाचा अपुर्व अनुभव त्याने घेतला. भक्ती रसात तल्लीन झालेली मंडळी बघितली. तेथे कोणी उच्च नाही नीच नाही. गरीब नाही किंवा श्रीमंत नाही. माऊलीकडे येणारे सगळे सारखेच. वडीलधारी मंडळी लहानांच्या पाया पडतात असे अपुर्व दृष्य अण्णाला पहायला मिळाले. भंडाऱ्याचा कार्यक्रम पण किती भक्तीपुर्ण असतो हे अण्णाला पहायला मिळाले. ज्ञानेश्वर माउलिंच्या मीरवणुकीत तर अण्णाची वयस्क आई चक्क तरुण होऊन फुगडी खेळु लागली, फेरीची गाणी गाऊ लागली. एकूणच सर्वांना समानतेच्या पातळीवर आणणारा हा भक्तीरसाचा सोहोळा अण्णाला अनुभवायला मिळाला.

जेव्हा बापुंनी मंदीर बांधायला काढले तेव्हा मुर्ती कुठून आणायची याची चर्चा चालु होती. त्यावेळी एक तरुण पुढे आला. तुम्ही फक्त मुर्ती निवडा, मुर्तिचा खर्च मी करतो असे म्हणाला. या तरुणाचे नांव नजीर शेख. या ठिकाणी अण्णाला हिन्दु मुसलमान ऐक्याचे दर्शन झाले. ज्ञानेश्वर माऊलिंची मुर्ती नजीर शेख या मुस्लीम तरुणाच्या देणगीतून आली आहे.

हिन्दु मुसलमान ऐक्याचा अनुभव अण्णा लहानपणापासून त्याच्या गावात घेत आला आहे. हनुमान हे ग्रामदैवत. दर वर्षी हनुमान जयंतिला हनुमानाची मोठी मिरवणुक निघते. त्यामधे गावातील हिन्दु लोकांबरोबरच मुस्लीम लोक पण मोठ्या संख्येने सामील होत असतात. त्याचप्रामाणे तेथे दर वर्षी पीरसाहेबांची पण यात्रा भरते. यामधे मुसलमान भाविकांबरोबर मोठ्या संख्येने हिन्दु भावीक पण सामील होत असतात. ही यात्रा हनुमान यात्रेपेक्षाही मोठी असते.दर वर्षी 250 बकरे नैवेद्य म्हणून कापले जतात. त्यातील 90 टक्के बकरे हिन्दुंनी कापलेले असतात. संध्याकाळी आसपासच्या गावावरून पाहुणे मंडळी येतात व रंगतदार मेजवानीचा फडशा पाडतात. रात्री तरुणांनी एखाद छानसं नाटक बसवलेलं असतं. या यात्रेस सहसा लोकनाट्य आणले जात नाही. दुसऱ्यादिवशी गावाबाहेर बैलगाड्यांची शर्यत असते. जवळ जवळ 125 च्या वर बैलगाड्या या शर्यतीत भाग घेतात. आदल्या रात्री आलेले पाहुणे मंडळी शिळया मटनावर ताव मारून आपापल्या घरी जातात.

अण्णा या दोन्ही यात्रा न चुकता इन्जॉय करतो.

अण्णाच्या मित्रांचे एक भ्रमण मंडळ पण आहे. अण्णाच्या गावातील त्याचे अनेक मित्र निरनिराळया ठिकाणी चांगल्या पोस्टवर काम करणारे आहेत. ते या भ्रामण मंडळाचे सदस्य आहेत. अचानक कुठेतरी सह कुटुंब पीकनीकला जायचा प्रोग्रॅम ठरतो. एक दिवशी अचानक कासतलावला जाण्याचा प्रोग्रॅम ठरला. हा तलाव साताऱ्यापासून पश्चिमेस साधारणपणे तीस किलोमीटर्सवर सह्याद्रीच्या कुशीत आहे. या तलावातून सातारा शहराला सायप्रस पद्धतीने पाणीपुरवठा होतो. अण्णा अशा सहलिंना जायला नेहमीच उत्सुक असतो. कारण भ्रमण मंडळाचे सर्व सदस्य सुशिक्षित आहेत. तसेच अण्णासारखे निर्व्यसनी पण आहेत. ते नेहमी एकमेकांना चांगले विचार ऐकवत असतात. भ्रमण मंडळाच्या प्रत्येक सदस्याने एक एक जबाबदारी उचलली आहे. त्यावेळी सातारला ‘हम आपके है कौन’ हा सिनेमा चालु होता. तो

संध्याकाळी सर्वांनी पहायचे ठरवले. त्याप्रामाणे सगळेजण बसने कास तलाव पहायला गेले. तेथे त्यांना कळले की तेथुन दहा किलोमीटरवर बामलोणी नावाचे गांव आहे. तेथुन बोटीने तापोळयाला जाता येते. मग सगळयांचा मोर्चा बामलोणिला वळला व बोट करून सगळे तापोळयाला पोचले. तेथे सर्वांनी छोट्या मोटर बोटितून फेऱ्या मारल्या. मग सगळे कास तलावला परत आले. तोर्यंत दुपारचे तीन वाजले होते. सगळयांना भुका लागल्या होत्या. पुरुष मंडळिंनी स्वयंपाकाची जबाबदारी उचलली होती. महिला वर्गाला आज सुट्टी दिली होती. मस्त बिर्याणिचा बेत होता. सगळेजण जेऊन तृप्त झाले होते. वाढण्यापासून ते भांडी घासण्यापर्यंत सगळे काम पुरुष मंडळी करत होती. संध्याकाळी पाचवाजता सगळी मंडळी सातारला जायला निघाली. संध्याकाळी सहाचा 'हम आपके है कौन' हा चित्रपट बघून सगळे रात्री परत आले. अशा प्रकारच्या ट्रिप्समधे अण्णाला भरपुर रिलॅकसेशन मिळते.

अण्णाने आपली ही फिरण्याची आवड जपून ठेवली आहे. भारत भ्रमण करून झाल्यावर नुकताच अण्णा रत्नमाला वहिनींबरोबर केसरीतर्फे युरोपची टुर करून आला आहे. ही टुर म्हणजे अण्णासाठी अविस्मरणीय आठवणींचा खजिनाच आहे.

अण्णाने असे अनेक चांगले छंद लाऊन घेतलेले असल्याने त्याला व्यसनाच्या जाळयात स्वतःला अडकावून घेण्याची जरुरी कधी वाटली नाही.

## हिंमते मर्दा

## वीस

अण्णाच्या घरातच नव्हे तर संपुर्ण घराण्यात शिक्षणाची परंपरा नव्हती. पारंपारीक शेतीचा व्यवसाय सोडून दुसरा कोठला व्यवसाय करण्याची मानसिकता पण नव्हती. अण्णाच्या कुटुंबाने ही परंपरा मोडून टाकली. अण्णाचे वडील फक्त पांचवी पर्यंत शिकलेले होते. अण्णाची आई तर पुर्णपणे अशिक्षीतच होती. पण दोघेही शिक्षणाचे महत्व ओळखून होते. आपल्या चारही मुलांनी चांगले शिक्षण घ्यावे म्हणून ते सतत प्रोत्साहन देत आले होते. अण्णाला याचा फायदा झाला व त्याला एम.एस.सी. मॅथेमॅटीक्स पर्यंत शिक्षण घेता आले. अण्णाच्या घरी भले गरिबी असेल. पण अण्णाच्या घरच्यांनी कधी त्याच्या शिक्षणाला पैसे कमी पडू दिले नाहीत. गरज लागेल तेव्हा गावातल्या सावकाराकडून कर्ज घ्यायला मागे पुढे पाहिले नाही. अण्णाच्या बंधुंनी पण त्याच्या शिक्षणाला यथासांग मदत केली. नाहीतर मॅट्रीक नंतरच अण्णाचे शिक्षण संपुष्टात आले असते व तो आयुष्यभर शेती करत व गुरे राखत राहिला असता.

असे अनेक टॅलेन्टेड लोक असतात की त्यांना पैशाअभावी उत्तम शिक्षण घेता येत नाही. त्यांच्यात उत्तम इंजिनीयर, उत्तम डॉक्टर, उत्तम मॅनेजर होण्याची क्षमता असते. पण या कोर्सेसचा खर्च परवडण्याची ताकद त्यांच्या कुटुंबात नसते. मग बी. ई. च्या ऐवजी बी.कॉम., एम.बी.बी.एस. च्या ऐवजी बी.एस.सी. किंवा एम.बी.ए. ऐवजी बी. ए. होणे त्यांच्या नशिबात येते. मग उत्तम इंजिनीयर होण्याची क्षमता असलेला माणूस एखाद्या बँकेत क्लार्क म्हणून नोकरीला लागतो व ऑफीसर म्हणून निवृत्त होतो. उत्तम डॉक्टर व्हायची क्षमता असलेला शाळेत शिक्षक होतो व हेड मास्तर म्हणून निवृत्त होतो. तर उत्तम मॅनेजर होण्याची क्षमता असलेला स्टेनो किंवा टायपिस्ट बनतो. ही शोकांतिका अनेकांच्या नशीबी आलेली असते.

शिक्षण हा अण्णाचा फार जिव्हाळयाचा विषय आहे. आपल्या आई वडिलांनी सुरु केलेली शिक्षणाची परंपरा अण्णाने आपल्या घरातच नव्हे तर आपल्या घराण्यात चालु ठेवली आहे. पैशांअभावी कोणाचे शिक्षण रखडलेले अण्णाला आवडत नाही. जस जशी अण्णाची आर्थिक परिस्थिती सुधारत गेली, त्यांने अनेक गरीब मुलांना शिक्षणासाठी मदत द्यायला सुरवात केली. अनेक शाळांना देणग्या दिल्या. अण्णाने दिलेल्या देणगीवर त्याच्या गावातील हायस्कुलचे अद्ययावत ग्रंथालय ऊभे आहे.

दामोदर बळवंत शिर्के हे मास्तर अण्णाला तिसरीला शीकवायला होते. ते हाडाचे मराठीचे शिक्षक होते. पुढे ते अण्णाला पाचविलापण शीकवायला होते. त्यांच्यामुळेच अण्णाला मराठी भाषेची गोडी लागली. त्यांनी गावासाठी खूप केले. गावातल्या प्रत्येक समारंभाला हजर असायचे. अण्णा त्यांचा फार आदर करायचा. बोराटे इंडस्ट्रिच्या उद्घाटण समारंभाला अण्णाने त्यांना खास आमंत्रीत केले होते. पोशाख देऊन त्यांचा सत्कार केला होता. निवृत्तीनंतर त्यांचे फार हाल झाले व त्यातच त्यांचा मृत्यु झाला.

त्यांना दोन मुले. त्यातील दिनकर हा त्यांचा दोन नंबरचा मुलगा. पहिल्यापासून मन लावून अभ्यास करणारा. वडिलांच छत्र हरवल होत. अगदी मोजकीच जमीन. त्यावर निर्वाह करावा लागे. अशा परिस्थितीत दिनकर बी.ए. झाला. पण त्याला काही नोकरी मिळेना. त्यातून त्याचे लग्न झालेले. कोणीतरी त्याला सांगितले की तु बी.एड. कर. पैशांचे पाठबळ नसतानासुद्धा त्याने जिद्दीने बी.एड. पुर्ण केले. पण त्याला काही केल्या नोकरी मिळेना. अगदी शिक्षकाची नोकरी पण मीळु शकली नाही. कारण ओळखी शिवाय काम होत नाही. मग वैतागून त्याने वयाच्या 28 व्या वर्षी सातारच्या लॉ कॉलेजमधे प्रवेश घेतला. अण्णाला जेव्हा हे कळले तो मुद्दामहून दिनकरला जाऊन भेटला. त्याला प्रोत्साहन दिले. गरिबीतही दिनकरची शिक्षणाची जिद्द अण्णाला कौतुकास्पद वाटली. त्यावेळी के.व्ही. पाटील म्हणून लॉ कॉलेजचे प्रिन्सीपॉल होते. ते एक नावाजलेले फौजदारी वकील पण होते. अण्णा त्यांना भेटला व दिनकरची सर्व परिस्थिती समजाऊन सांगितली. त्याने दिनकरला त्यांच्या ऑफीसमधे ठेऊन घेतले. अशा रितिने अण्णाच्या प्रयत्नाने दिनकरचे ‘कमवा आणि शिका’ या पद्धतीने पहिल्या वर्षाचे शिक्षण सुरु झाले. त्याची पुढील दोन वर्षांची फी अण्णाने भरली. अण्णाने दिनकरला लगेच पुण्याला आणले. अप्पा बळवंत चौकातून जेव्हडी पुस्तके मिळाली तेव्हडी घेऊन दिली. जी पुस्तके मिळाली नाहीत त्याची यादी अण्णाने ठेऊन घेतली व पुढील आठवड्यात ती पुस्तके वीकत घेऊन दिनकरकडे पाठवली. कपडे घेण्यासाठी पैसे दिले. दिनकरचे लॉ कॉलेजचे दुसरे वर्ष

सुरु झाले. अण्णाच्या गावच्या नझीर शेखने दिनकरला बरीच आर्थिक मदत केली. तसेच त्याच्या शेतीसाठी पण मदत केली. पाटील सरांकडे काम, अण्णा व नझीर शेख यांची मदत त्यामुळे त्याने वकिलिचे तीसरे वर्ष पुरे केले. दिनकर शिर्के खरोखरच वकील झाला. अण्णाला त्याचा अभिमान वाटतो. माणसाकडे खरोखरच जिद्द असेल तर काय होते त्याचे हे आदर्श उदाहरण आहे.

दिनकर एल.एल.बी. पास झाला. त्याला सनद घ्यायची होती पण पैसे नव्हते. अण्णाने त्याला सनद घेण्यासाठी पैसे दिले. त्याला सनद मिळाल्यावर अण्णाने त्याला वकिलाचा काळा सुट शिवून दिला. आज दिनकर सातारला ॲडव्होकेट के.व्ही. पाटलांबरोबर प्रॅक्टीस करतो. कोर्टात त्याच्याभोवती लोक असतात. त्याला साहेब म्हणतात. हे पाहून अण्णाला फार बरे वाटते.

आपण एका माणसाचे तरी आयुष्य घडवायला उपयोगी पडू शकलो याचा आनंद अण्णाला इतर कोणत्याही आनंदापेक्षा जास्त आहे.

## हिंमते मर्दा

## एकवीस

आधी अण्णाचे पुण्याला एकच युनिट होते. त्यानंतर सातारची दोन युनिटस चालु झाली. पुण्याला अजून एखादे युनिट सुरु करता आले तर बरे होईल असे अण्णाला सारखे वाटायचे. पण योग्य संधी मिळत नव्हती. पण या बाबतीत अण्णा नशीबवान ठरला. अशी संधी अण्णाकडे चालून आली.

अण्णाचे एक सहकारी श्री. साळवे हे पुर्वी सेन्ट्रल बँकेत होते. मग ते नोकरी सोडून एका खाजगी कंपनीत नोकरी करु लागले. त्या कंपनीचे एक युनिट भोसरीमधे अण्णाच्या फॅक्टरीच्या जवळच होते. ते युनिट विक्रिसाठी उपलब्ध असल्याची माहिती अण्णाला श्री. साळवे यांचेकडून कळली. अण्णाने लगेच ते युनिट घेण्यामधे रुची दाखवली व लगेच ते युनिट पहायला गेला.

अण्णाने जेव्हा त्या युनिटला भेट दिली तेव्हा त्या युनिटची दैना झाली होती. युनिट बंद होते. त्याची शेड गंजुन गेली होती. आत मशीनरी नव्हती. रात्रीच्या वेळी दारु पिण्यासाठी या युनिटचा लोक गैरवापर करत होते. कंपाऊंड वॉलपण नव्हती. हे एक केमिकल युनिट होते. अण्णाने जी किंमत सांगितली ती त्या पार्टीने मान्य केली. या युनिटवर अनेक लायेबिलीटीज होत्या. अण्णाने त्या सर्व लायेबिलिटीज सकट युनिट विकत घेण्याची तयारी दाखवली. सर्व लायेबिलीटज पुर्ण केल्यावर जे पैसे उरतील ते पार्टीला देण्याचे मान्य केले. पार्टीने पण ते मान्य केले. त्यामुळे सर्व व्यवहार सुरळीतपणे पार पडला. अण्णाला सातारला जसा अनुभव आला तसा अनुभव यावेळी आला नाही.

अण्णाने यासाठी सेन्ट्रल बँकेकडून कर्ज घेतले. 14000 स्क्वे. फुटाच्या प्लॉटवर 7000 स्क्वे. फुटांचे नवीन बांधकाम केले. ऑफीस साठी अद्ययावत इमारत बांधली. युवराज त्यावेळी इंजिनीयरींग कॉलेजमधे जाऊ लागला होता. तेव्हापासूनच त्याने अण्णाच्या बिझिनेसमधे आवडीने लक्ष घालायला सुरवात केली होती. दिपाली तर इंजिनीयर झाल्यापासून लगेचच अण्णाच्या फॅक्टरीत येऊ लागली होती. या युनिटच्या उभारणीमधे दिपाली व युवराजचे योगदान महत्वाचे आहे.

इलाईट प्लॅस्टीक इंडस्ट्रीमधे लहान म्हणजे 30 ग्रॅम ते 150 ग्रॅम कपॅसिटिची मशीन्स आहेत. जस जसा बिझिनेस वाढु लागला, अण्णाला जास्त कपॅसिटी असलेल्या मशीनची जरुरी भासु लागली होती. नवीन युनिटचे नांव प्लास्टो मेक असे ठेवण्याचे ठरले. या ठिकाणी अण्णाने जास्त कपॅसिटीची, म्हणजे 30 ग्रॅम ते 4 किलो कपॅसिटिची अत्याधुनीक मशीन्स बसविण्याचे ठरवले. नऊ महिन्यांमधे युनिटच्या बांधकामाचे काम पुर्ण होऊन युनिट चालु झाले.

पण पहिल्यांदा युनिटला काम मिळत नव्हते. अण्णाने दोन तीन ठिकाणी प्रयत्न करून बघितले. पण त्याला यश आले नाही. मग युवराजने प्रयत्न करायचे ठरवले. त्यासाठी त्याने एका प्रतिष्ठित ऍटोमोबाईल कॉम्पोनंटस बनविणाऱ्या कंपनीत प्रयत्न केले. त्याच्या प्रयत्नांना यश मिळून या कंपनीचे काम मोठ्या प्रमाणावर मिळू लागले. तसेच एक्साईड कंपनीला निरनिराळया आकाराचे व वजनाचे प्लॅस्टीक कंटेनर्स आणि कव्हर्स लागतात त्याचे काम मोठ्या प्रमाणावर या युनिटला मिळू लागले. या युनिटमुळे अण्णाच्या टर्न ओव्हरमधे चांगलीच भर पडली.

हे युनिट युवराजच्या नांवाने असले तरी दिपाली या युनिटमधे पुर्ण वेळ काम करते. आपल्या धाकट्या भावाच्या कारखान्यांत, त्याच्या हाताखाली काम करण्यामधे तिला कसल्याही प्रकारचा कमीपणा वाटत नाही. त्या दोघांनी मिळून त्यांच्या युनिटला अत्याधुनीक स्वरुप आणले आहे. उच्च दर्जाच्या उत्पादन क्षमतेबरोबर उच्चा दर्जाची व्यावसायिकता व व्यवस्थापन आणण्याचा दोघांचा प्रयत्न चालु आहे. त्यासाठी त्यांनी आए. एस. ओ., टी. एस. 16949 या सारखी प्रेस्टीजस सर्टिफिकेशन मिळवली आहेत. त्याचप्रमाणे व्ही.डी.ए. 6.3 ही जर्मन क्वालिटी प्रणाली वापरायला सुरवात केली आहे. प्लॅस्टीक मोल्डींगमधे मोल्डसना फार

महत्व असते. त्यासाठी आद्ययावत टुलरुम बनविण्यात आली आहे. तसेच चीनमधे मोल्ड बनवून देणारे सप्लायर्स डेव्हलप केले आहेत आज पुण्याच्या दोन्ही युनिटसमधे मिळून 150 च्या वर लोक काम करीत आहेत. त्यांच्या संपुर्ण मॅनेजमेन्टची जाबाबदारी दिपालिने घेतली आहे. नवीन डेव्हलपमेन्ट, बिझीनेस डेव्हलपमेन्ट, मार्केटींगची आणि फायनान्स ही जबाबदारी युवराजची आहे. उत्तमकडे सर्व टेक्नीकल व मेन्टेनन्सची जबाबदारी आहे. आज त्यांना जनरल मोटर्स (जी.एम.) व फॉक्स वॅगन ( व्ही.डब्लु.) या दोन आंतर राष्ट्रीय कंपन्या ओ. ई. एम. म्हणून मिळाल्या आहेत. फॉक्स वॅगन कंपनीचे ऑडीट हे अत्यंत कढीण मानले जाते. ते संपुर्णपणे जर्मन स्टँडर्डवर आधारीत असते. भारतीय कंपन्यांना पहिल्या प्रयत्नात यामधे पास होणे कठीण असते. पण प्लॉस्टो मेक ही कंपनी युवराजच्या नेत्रृत्वाखाली हे ऑडीट पहिल्या प्रयत्नातच पास झाली व त्यामुळे त्यांना मोठ्या प्रमाणावर आडर्स मिळू लागल्या आहेत. त्यांचे युरोपीयन कंपन्यांबरोबर जॉइंट व्हेंचर साठी तसेच फॉरीन मार्केट्स डेव्हलप करण्यासाठी प्रयत्न चालु आहेत.

## हिंमते मर्दा

## बावीस

अण्णाच्या आयुष्याची सुरवात गरिबीत झाली. पण आता अण्णाची परिस्थिती श्रीमंत वर्गात मोडणारी आहे. त्याचे बालपण झोपडीसारख्या घरात गेले. वेगळे घर घ्यायला पैसे नव्हते म्हणून त्याला आपल्या फॅक्टरीतच संसार मांडायची पाळी आली. या अण्णाचे आज पुण्यात दोन बंगले असून एकात तो रहातो तर दुसरा बंगला उत्तमला दिला आहे. कोण्या एके काळी अण्णा पुण्याला मैलोंमैल भाड्याच्या सायकलवर फ़िरत होता. सायकलचे भाडेसुद्धा द्यायचे पैसे नसायचे. मित्रांकडून पैसे उसने घ्यावे लागायचे. त्याच अण्णाकडे आज अनेक मोटारी आहेत. त्यासुद्धा लेटेस्ट मॉडेलच्या. एक वेळ अशी होती की अण्णाच्या फॅक्टरीत काम करणाऱ्या महिला कामगाराच्या साड्या रत्नमाला वहिनींच्या साड्यांपेक्षा भारी असायच्या. त्याच्या मुलीचे कपडे अण्णाच्या मुलीच्या कपड्यांपेक्षा उत्तम असायचे. रत्नमाला वहिनी एका लग्नाला गेलेल्या असताना तेथे मुलीचे कपडे उसवले व घालायला दुसरे कपडे नव्हते म्हणून रडल्या होत्या. त्यांच्याच अंगावर हल्ली भारी भारी साड्या असतात. अण्णाने आपल्या मुलांना उत्तम शिक्षण दिले. दोन मुली आणि मुलगा इंजिनीयर झाले. एक मुलगी डी..बी.एम. झाली. इंजिनीयर झालेली सून पण आता एम. बी. ए. करत आहे. ज्या अण्णाकडे गावी जाण्यासाठी एस.टी. च्या भाड्याचे पण पैसे नसायचे तोच अण्णा आता स्वखर्चाने जागतीक टुर करु शकतो. अण्णाने हे सगळे वैभव मिळवले ते केवळ तो उद्योजक बनल्यामुळे! तो जर नोकरी करत राहिला असता तर हे वैभव मिळाले नसते. सर्वसामान्य मराठी माणसासारखा तो वयाच्या साठाव्या वर्षी निवृत्त झाला असता, व उरलेले आयुष्या आरामात म्हणजे काहिही न करता घालवत बसला असता.

पण अण्णाने जो पैसा मिळवला ते त्याच्या दृष्टीने त्याने मिळवलेले खरे वैभव नव्हे. त्याच्या दृष्टीने त्याने मिळवलेले खरे वैभव म्हणजे त्याला भेटलेली चांगली माणसे. अण्णाला पहिल्यापासूनच माणसे गोळा करण्याचा छंद होता. शाळेत व कॉलेजमधे त्याला हनुमंत माने, विकास पाटोळे सारखे चांगले मित्र भेटले. आबासाहेब गरवारे, बी.जी. शिर्के यांसारख्या दिग्गज उद्योगपतिंशी संबंध आला. अशीच त्याला अजून दोन दिग्गज माणसे भेटली.

अण्णाच्याकडे मापारी म्हणून एक कामगार होता. तो अनेकवेळा अण्णाला त्याच्या गावी बोलवायचा. त्याने त्याच्या गावाचे नांव राळेगण सिध्धी असे सांगितले होते.

अहमद नगर जिल्ह्यात केठेतरी त्याचे गांव आहे एवढेच अण्णाला ठाऊक होते. अण्णा हजारे नांवाच्या मिलीटरीतून रिटायर झालेल्या एका ड्रायव्हरने आमच्या गावात काय कायापालट केला आहे ते बघायला या असे मापारी अण्णाला सांगायचा. अण्णाला पहिल्यापासूनच ग्रामीण भागाबद्दल फार जिव्हाळा. ग्रामीण भागात कुठे काही चांगले चालु असेल तर ते जाऊन बघायची अण्णाची इच्छा असायची. त्याने अण्णा हजारेंचे नांव ऐकले होते. त्यांच्या ग्रामसुधार योजनांबद्दल पण ऐकले होते. अण्णाला पण अण्णा हजारेंना भेटण्याची इच्छा होती. पण आपल्याशी बोलतील कां? आपल्या कार्याविषयी सांगतील का? या विषयी अण्णाला शंका होती.

एका गुरवारी सुट्टिच्या दिवशी अण्णा मापारी बरोबर त्याच्या गावी जायला निघाला. अर्थातच बरोबर रत्नमाला वहिनी व छोटा, तीन वर्षाचा युवराज पण होता. राळेगण सिध्धीला आल्यावर सगळेजण पहिल्यांदा गावामधे मंदीर आहे तेथे अण्णा हजारे यांना भेटायला गेले. अण्णा देवळात पेपर वाचत बसले होते. एकदम साधी रहाणी. अंगात दंडक घातलेल व साधे धोतर असा पेहेराव. त्यांच्या आसपास उठावशीर अशी एकही वस्तु आढळली नाही. एका कोपऱ्यात एक पेटी दिसत होती. देवळात धान्य भरपुर पडलेले होते. अण्णा पाया पडला. मापारीने अण्णाची ओळख करून दिली. हे आमच्या कंपनीचे मालक आहेत. आपणास भेटण्यासाठी आले आहेत असे मापारीने सांगितले. अण्णाने लगेच सांगितले की मी प्रथम आपला चाहता आहे, नंतर कंपनीचा मालक आहे. त्यांना सर्व माहिती सांगितली.

अण्णा हजारे खुपच आपुलकिने बोलले. ते ज्या योजना राबवीत होते त्याची माहिती सांगितली. त्यांना आलेली पत्रे वाचायला दिली. गावातील लोकांची त्यांनी कशी एकी घडवून आणली ते सांगितले. सुरवातीला त्यांना गावात विरोध झाला. आता ते सर्व गावकरी एकोप्याने रहातात. कष्ट करतात. पिकांचे नियोजन करतात. पाण्यासाठी त्यांनी काय केले हे अण्णा हजारे मन लाऊन सांगत होते. अण्णा म्हणाले, आत्ता आपण बसलो आहोत याच मंदिराची लाकडे काढून गावातील गुंड दारुच्या भट्टिसाठी वापरत असत. गावातील लोक दुष्काळाने गांजले होते. आपापसात भांडणे करीत. गावाला गरिबी, अज्ञान, अंधश्रद्धा यांनी ग्रासले होते. अण्णांनी मिलिटरीतून आल्यानंतर आपल्या गावचा विकास आपणच करायचा असे ठरवले. पहिले काम गावातील लोकांचा पाठिंबा मिळविणे हे होते. त्यांचा विश्वास मिळविल्याशिवाय काही होणार नव्हते. अण्णांनी हळु हळु लोकांचे मत परिवर्तन घडवून आणले. प्रसंगी कडक भुमिका घेतली. पण आपल्या भल्यासाठी अण्णा हे करतात म्हटल्यावर

इतरांनी अण्णांना साथ दिली आणि जादु घडावी तस हे छोटेसे गांव भारताच्या नकाशावर आले. (आता तर हे गांव जगाच्या नकाशावर गेले आहे.) आदर्श गांव असा लौकीक झाला. हे ऐकून अण्णा आश्चर्यचकीत झाला. ज्या मंदिराची लाकडे तोडून नेत होते तेच मंदीर त्या लोकांनी श्रमदानाने चांगल्या पद्धतीने बांधुन काढले. अण्णा हजारेंना मिळालेले सोन्याचे मेडल उघड्यावर पडले होते, तरी आता ते कोणी नेत नव्हते. सरबत वगैरे देऊन अण्णा हजारे या एका अण्णाने दुसऱ्या अण्णाचा पाहुणचार केला. तिथे येणाऱ्या पाहुण्यांसाठी जेवायचीसुद्धा व्यवस्था आहे. पण अण्णाला मापारीकडे जायचे असल्यामुळे त्याला या जेवणाचा पाहुणचार घेता आला नाही. मापारीने अण्णाला मुलांची शाळा, वसतीगृह, ठीबक सींचन, बायोगॅस प्लँट सर्व काही फ़िरून दाखवले. कोण्या एकेकाळी दुष्काळग्रस्त असलेल्या या गावातून आता अन्न धान्य निर्यात होऊ लागले आहे हे ऐकून अण्णा चांगलाच भारावून गेला. अण्णा हजारेंसारखा एक सामान्य मनुष्य काय चमत्कार करु शकतो हे अण्णाला याची देही याची डोळा पहायला मिळाले. मापारीच्या घरी अण्णाचे जंगी स्वागत झाले. कंपनीचे मालक येणार म्हणून मापारीचे सगळे कुटुंब जमले होते. त्यांनी सर्वांना प्रेमाने जेवायला घातले. रत्नमाला वहिनींची खणा नारळाने ओटी भरली. युवराजला नवीन कपडे घेतले. किती प्रेमाने ते वागत होते. साधी माणसे देखील किती आगत्यशील असू शकतात याचा अण्णाला अनुभव आला. संध्याकाळी रांजणगावच्या गणपतिचे दर्शन घेऊन अण्णा पुण्याला परत आला. अण्णा हजारेंची झालेली भेट हा अण्णाच्या आयुष्यातील एक अविस्मरणीय अनुभव आहे.

अण्णाला भेटलेले असेच अजून एक दिग्गज व्यक्तीमत्व म्हणजे अप्पासाहेब पवार. महाराष्ट्राचे लाडके नेतृत्व, महाराष्ट्राचे माजी मुख्य मंत्री, भारताचे माजी संरक्षण मंत्री, माजी केंद्रीय कृषी मंत्री व राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्षाचे संस्थापक श्री. शरद पवार यांचे ते थोरले बंधु. ग्रामीण भागातील लोकांच्या प्रगतीसाठी प्रचंड तळमळ असलेले असे हे व्यक्तीमत्व. ते स्वतः उच्च शिक्षीत असून, एका साखर कारखान्याचे मॅनेजींग डायरेक्टर असूनसुद्धा ग्रामीण जनतेच्या उद्धारासाठी, प्रगतीसाठी तळमळिने काम करणारे. खऱ्या अर्थाने कृषीतज्ञ! आधुनीक टेक्नॉलॉजी वापरून भारतातील शेतीचा दर्जा व उत्पादकता वाढावी यासाठी त्यांनी केलेले अथक प्रयत्न! तेसुद्धा आपल्या बंधुंच्या पोलिटीकल करीअरचा कोणत्याही प्रकारे फायदा न घेता. अप्पासाहेबांबद्दल बोलणे म्हणजे सुर्याला धरायला जाण असे अण्णाचे मत आहे.

ग्रामीण भागातील तरुणांनी उद्योग धंद्यात पुढे यावे, त्यांनी कारखाने काढून कारखानदार व्हावे यासाठी पण अप्पासाहेबांचे प्रयत्न चालु असत. ते ग्रामीण भागातील

युवकांना पुण्याला आणून त्यांना निरनिराळया कारखान्यांच्या भेटी घडवून आणत. अण्णाचा मित्र विठ्ठल काळभोर व अप्पासाहेबांचे चांगले संबंध होते. विठ्ठलने अप्पासाहेबांना अण्णाची माहिती सांगितली होती. ग्रामीण भागातील एका गरीब शेतकरी कुटुंबातून आलेला एक माणूस कारखानदार झाला याचे त्यांना कौतुक वाटले असावे. एक दिवशी विठ्ठल काळभोरचा अण्णाला फोन आला की ग्रामीण भागातील काही तरुणांना घेऊन अप्पासाहेब तुमच्या फॅक्टरीला भेट द्यायला येणार आहेत. हे ऐकून अण्णाला आनंद झाला. सांगितल्याप्रमाणे ते लोक आले. चार एस.टी. गाड्या भरून लोक आले होते. अर्थातच त्यांच्याबरोबर अप्पासाहेब पण होतेच. सर्वांनी अण्णाची महाराष्ट्रातील सर्वोत्कृष्ट लघुउद्योगाचे पारितोषिक मिळालेली फ़ॅक्टरी पाहिली. त्यांनी अण्णाचे कौतुक करून पाठ थोपटली. त्यावेळी शरद पवार महाराष्ट्राचे मुख्यमंत्री होते. मुख्यमंत्र्यांचे बंधु आपली फॅक्टरी बघायला आले व त्यांनी कौतुकाने पाठ थोपटली यामुळे अण्णाला मुठभर मांस चढल्यासारखे वाटले. विशेष म्हणजे ते स्वतःकरता न येता वेगळया सामाजिक बांधीलकीने ते आले होते. त्यांनी अण्णाला दुसऱ्या दिवशी चिंचवड स्टेशनजवळ हायवे टॉवर्स म्हणून एक बिल्डींग आहे तिथं बोलावले. तेथे मोठा तंबु उभारला होता. अप्पासाहेब पण रात्री त्या तंबुतच झोपले होते हे ऐकून अण्णा भारावून गेला. त्यांनी अण्णाला जेवून जायचा आग्रह केला. मस्त पिठल भाकरीचा बेत होता. अण्णाच्या तोंडाला पाणीच सुटले. त्यांनी अण्णाचा शाल व श्रीफळ देऊन सत्कार केला. महाराष्ट्राच्या मुख्यमंत्र्यांचा बंधुंचा, अप्पासाहेबांचा हा साधेपणा बघून अण्णाच्या मनात त्यांच्यावीषयिचा आदर कित्येक पटीने वाढला.

अशीच अण्णाला भेटलेली अजून एक व्यक्ती म्हणजे दादा कोंडके. एके दिवशी एप्रील महिन्यांत अण्णाला एक फोन आला. ‘ आपण सदाशीव बोराटे कां?’ अशे असे फोन करणाऱ्या माणसाने विचारले. अण्णाने होय म्हणून उत्तर देताच मी दादा कोंडके यांचा खाजगी सेक्रेटरी बोलतो आहे. दादांना तुम्हाला भेटायची इच्छा आहे. त्यासाठी तुम्ही उद्या सकाळी आपटे रोडवरील श्रेयस हॉटेलवर येऊ शकाल कां म्हणून विचारणा केली. अण्णाचा विश्वासच बसे ना! आपल्याला कोणी एप्रील फुल तर करत नाही नां असे अण्णाला वाटले. दादा कोंडके म्हणजे मराठी नाट्यसृष्टी व चित्रपट सृष्टितील एक दैदिप्यमान तारा व अजब व्यक्तीमत्व. त्यावेळी महाराष्ट्रांत अशी एकही व्यक्ती नसेल की ज्याला दादा कोंडकेंचे नांव माहीत नसेल. एका पाठोपाठ एक असे नऊ सिल्वर ज्युबिली चित्रपट देणारे म्हणून ज्यांचे नांव गिनीस बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डमधे नोंदवले गेले असे त्तीमत्व. वीस वर्षांत त्यांनी अनेक मराठी चित्रपटांत अविस्मरणीय भुमिका केलेल्या. अशा या व्यक्तीने आपल्याला कशासाठी भेटायला बोलावले

असेल असा प्रश्न अण्णाला पडला. ठरल्याप्रमाणे अण्णा दुसऱ्या दिवशी श्रेयस हॉटेलमधे गेला. तेथे दादा कोंडकेंची भेट झाली. त्यांच्या अत्यंत साध्या आणि मनमिळावु व्यक्तीमत्वाने अण्णा भारावून गेला. त्यांनी अण्णाचे आत्मचरित्र वाचले होते. ते त्यांना आवडले होते. म्हणून त्यांनी अण्णाला मोठ्या प्रेमाने भेटायला बोलावले होते. त्यांनी मोठ्या प्रेमाने अण्णाला भोजनाचे निमंत्रण दिले. अण्णाच्या पुस्तकावर चित्रपट निर्माण करायची इच्छा व्यक्त केली. हे ऐकून अण्णाला फार आनंद वाटला. दादा कोंडकेंसारख्या दिग्गज व्यक्तिला आपले पुस्तक आवडले व ते चित्रपट काढण्याच्या योग्यतेचे वाटते हे पाहून अण्णाला सार्थक झाल्यासारखे वाटले. दादा कोंडकेंचे खडकवासल्याला शुटींग चालु होते. ते पहायला त्यांनी अण्णाला मोठ्या प्रेमाने बोलावले. पण वेळेअभावी अण्णा जाऊ शकला नाही. त्यानंतर अण्णाने बांधलेल्या घराची वास्तुशांत होती. त्यासाठी अण्णाने खास दादा कोंडकेंना निमंत्रण दिले. दादांनी पण यायचे मान्य केले. पण अण्णाच्या नशीबांत हे नव्हते. आदल्या दिवशीच दादा कोंडकेंचे हार्ट अटॅकने दुःखद नीधन झाले. पण अण्णाच्या मनांत दादा कोंडके कायमचे घर करून बसले.

अशा रितिने अण्णाने अनेक चांगली माणसे गोळा केली आहेत. काही शिक्षण संस्थांमधे, औद्योगीक संस्थांमधे अण्णाला लेक्चर देण्यासाठी बोलावणी येत असतात. आबासाहेब गरवारे, बीं.जी. शिर्के, अण्णा हजारे, अप्पासाहेब पवार यांसारख्या दीग्गज व्यक्तीमत्वांशी परीचय झाला. त्यांचे विचार ऐकायला मिळाले. त्यांचे मार्गदर्शन मिळाले. तसेच अनेक लोकांचे सहकार्य मिळाले. अण्णाच्या मते त्यांनी ही कमवलेली दौलत पैशांच्या संपत्तीपेक्षा खुप मोठी आहे.

केवळ उद्योजक असल्यामुळेच अण्णाला हे शक्य झाले. तो जर नोकरी करत असता तर हे शक्य झाले नसते असे त्याचे मत आहे.

## हिंमते मर्दा

## बावीस

अण्णाच्या इलाईट प्लॅस्टीक इंडस्ट्रीज या कंपनीची सुरवात भोसरीच्या एम.आय.डी.सी. मधील दहा हजार चौरस फुटांच्या एका छोट्याशा प्लॉटपासून झाली. त्यावर सात हजार स्क्वेअर फुटांचे बांधकाम आहे. पुर्वी तेथे जुन्या मशीन्स बसवलेल्या होत्या. त्याजागी आता अद्ययावत मशिन्स बसवल्या आहेत. या युनिटची आता चार युनिट्स झाली आहेत. धंद्याचं शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना आदर्श युनिट दाखवण्यासाठी त्यांच्या शिक्षण संस्था इथं पाठवतात. कधी कधी अण्णाला त्याचे स्वानुभव सांगण्यासाठी त्यांच्या संस्थेत बोलावतात. तेथे अण्णाबद्दल चांगले बोलले जाते. ते ऐकून अण्णाचे मन भरून येते.

उत्तमची अण्णाला पहिल्यापासूनच उत्तम साथ मिळालेली आहे. उत्तमकडे इंजिनीयरींगचे कोणत्याही प्रकारची डिग्री, डिप्लोमा, सर्टिफिकेट किंवा क्वालिफिकेशन नसताना त्याने उत्तम इंजिनीयर होऊन दाखवले आहे. जर एखाद्या माणसामधे तांत्रिक विषयांची खरोखरच रुची असेल, पण त्याला योग्य ते तंत्रशिक्षण घेण्याची संधी मिळाली नसेल तरी तो आयुष्यांत मागे पडू शकत नाही हे उत्तमने स्वतःच्या उदाहराणे सिद्ध करून दाखवले आहे. जगातील थोर शास्त्रज्ञ थॉमस अल्वा एडीसन फक्त ईयत्ता चौथीपर्यंत शिकलेला होता. तर ऍपलचा स्टिव्ह जॉब्सकडे इंजिनीयरींगचे कोणतेही क्वालिफिकेशन नसताना आज त्याची गणना थॉमस अल्वा एडीसन नंतरचा सर्वात हुषार इंजिनीयर म्हणून केली जाते. त्यामुळे केवळ माझ्याकडे टेक्नीकल क्वलिफिकेशन नाही म्हणून मी एखादी तांत्रिक गोष्ट येत असूनही करु शकत नाही अशा प्रकारची मनोवृत्ती असलेल्या लोकांसाठी हे एक झणझणीत अंजन आहे.

एकदा अण्णाला HEMRL चे डायरेक्टर श्री. देशपांडे यांचा फोन आला. त्यांनी अण्णाला भेटायला सुतारवाडी, पाषाणला बोलावले. रशीयन बनावटिचे अनेक रणगाडे

भारतीय सैन्याकडे आहेत. त्या रणगाड्यावर टि.व्ही 2 प्रकारची तोफ असते. पुर्वी त्याकरता लागणारे बॉम्ब रशियातून येत असत. ते फार महाग असत. शिवाय रशियाचे विघटन झाले होते. त्यामुळे आपल्याकडे असलेल्या रशीयन रणगाड्यांसाठी बॉम्ब मिळेनासे झाले. त्यांनी बऱ्याच प्लॅस्टीक मोल्डर्सकडे जाऊन बॉम्बवरील कव्हर बनविण्याचा प्रयत्न केला होता. त्याला स्लीव्ह म्हणतात. पण कोणीही ती स्लीव्ह पुर्ण भरु शकले नाही. अण्णाचे एक स्नेही डॉ. अभंग यांनी त्यांना सांगितले की बोराटे म्हणून भोसरीत उत्कृष्ट प्लॅस्टीक मोल्डींग करणारे आहेत. ते तुमचे काम करून देतील. देशपांडेंनी अण्णाला डॉ. एस.एन.सिंग यांच्याकडे पाठवले. त्यांनी अण्णाला सर्व समजाऊन सांगितले. त्यांचेकडे असलेला मोल्ड दाखवला. त्यांनी जो मोल्ड बनवला होता त्याचे डिझाईन बरोबर नव्हते. अण्णाने त्यांना सांगितले की आम्ही तुम्हाला तुमच्या मोल्डवर पीस काढून दाखवु पण उत्पादनाच्या वेळी नवीन मोल्ड बनवून घ्यावा लागेल. अण्णाने त्यांच्या मोल्डवर पीस काढून दाखवला. डॉ. देशपांडे व डॉ. एस.एन. सिंग भलतेच खुष झाले. या आधी त्यासाठी खूप वेळ व पैसा खर्च झाला होता. शिवाय दिल्लीवरून सतत विचारणा होत होती. त्यांनी ताबडतोब नवीन मोल्डसाठी पुन्हा टेंडर काढले. अण्णाचे टेंडर मंजुर झाले. उत्तमने एका महिन्यात मोल्ड बनविला. त्यांचा यावर विश्वासच बसेना. आगोदर फक्त मोल्ड बनविण्यात त्यांचे चार महिने वाया गेले होते. शिवाय एकही स्लीव्ह ते बनवु शकले नाहीत. पहिल्या झटक्यातच अण्णाचा मोल्ड यशस्वी झाला होता. डॉ. एस. एन. सिंग स्वतः पेढे घेऊन आले. सहा महिने त्यांच्या चाचण्या चालु होत्या. त्या यशस्वीपणे पार पडल्या. HEMRL ही संशोधन संस्था आहे. पुढील उत्पादनासाठी आता भंडारा येथील ऑर्डनन्स फॅक्टरीकडे हे तंत्रज्ञान गेले आहे. या फॅक्टरीचे जनरल मॅनेजर मुद्दामहून अण्णाच्या फॅक्टरीला भेट देण्यासाठी आले होते. एरवी सरकारी फॅक्टरीमधे बाहेरच्या खाजगी कंपनीचे रजिस्ट्रेशन व्हायला फार वेळ लागतो. पण भंडाऱ्याच्या फॅक्टरीने अण्णाच्या कंपनीचे रजिस्ट्रेशन केवळ पंधरा दिवसांमधे केले. अण्णाला या फॅक्टरीकडून लाखो रुपयांच्या ऑर्डर्स मिळाल्या. केवळ उत्तमने प्राप्त केलेल्या कौशल्यामुळे अण्णाला हे शक्य झाले.

## हिंमते मर्दा

## तेवीस

सहासष्ट वर्षांच्या आपल्या आयुष्यात अण्णाने अनेक उन्हाळे-पावसाळे बघितले. अनेक चढ-उतार पाहिले. अनेक अप्स आणि डाऊन्स अनुभवले. त्याला अनेक खाच खळग्यातून जावे लागले. अक्षरशः शुन्यातून सुरवात करावी लागली. ' खिशात नाही दमडा आणि निघाला कारखानदार व्हायला.' अशा प्रकारची कुचेष्टा सहन करत-करतच तो लहानाचा मोठा झाला. त्याला फसवणारे, टोपी घालणारे, बावळट ठरविणारे, अंडर एस्टिमेट करणारे अनेक जण भेटले. या सगळयांशी जिद्दीने आणि धीराने सामना करत प्रगती केली. आज अण्णा वर्षाला 40 कोटी रुपयांच्या वर टर्न ओव्हर, चार युनिटस व दोनशे माणसे काम करीत असलेल्या कंपनीचा मालक आहे. आता त्याच्या धंद्याची सुत्रे हातात घेण्यासाठी त्याची दुसरी पिढी, म्हणजे त्याची मुलगी दिपाली व मुलगा युवराज तयार होत आहेत.

मी एकदा अण्णाला सहज विचारले की त्याने मिळविलेल्या यशाचे श्रेय तो कोणाला देतो. मी आत्तापर्यंत हा प्रश्न अनेक जणांना विचारला आहे. सर्वसाधारणपणे ठरावीक उत्तरे मिळतात. बहुतेकजण आपल्या यशाचे श्रेय आपल्या आईवडिलांना, आपल्या कुटुंबियांना किंवा आपल्या सहकाऱ्यांना देतात. पण अण्णाने जे उत्तर दिले ते ऐकून मी अवाकच झालो. अण्णा त्याच्या यशाचे सारे श्रेय त्याच्या विरोधकांना आणि टिकाकारांना देतो. अण्णाच्या मते त्याला आयुष्यात पावलो पावली असे विरोधक व टिकाकार भेटले नसते तर त्याच्यातील इर्षा जागी झाली नसती आणि त्याने एवढी प्रगती केली नसती. आपल्या विरोधकांचे व टिकाकारांचे ऋण खुलेपणाने मान्य करणारा अण्णा हा मला भेटलेला पहिला व एकमेव मराठी उद्योजक आहे.

अण्णाला उद्योजक म्हणून जे काही बरे वाईट अनुभव आले, त्यावर त्याने आपली काही मते बनवली आहेत. अण्णा निर्भीडपणे आपली मते मांडत असतो. अण्णाची ही मते सडेतोड आणि वास्तवावर आधारीत आहेत. आपण सगळयाच मराठी माणसांनी अण्णाच्या या मतांवर गंभीरपणे विचार करण्याची पाळी आता आली आहे. अण्णाचे हे विचार त्याच्याच शब्दांमधे खाली देत आहे.

अण्णा म्हणतो

आपण मागे कां याचा शोध मराठी माणसांनी घ्यावा असे प्रत्येकाला वाटत असते. पण या बाबत पुरेस आत्मपरीक्षण केले जात नाही. पुण्यात आल्यावर मला प्रामुख्याने असे जाणवल की मराठी माणूस नोकरीप्रिय आहे. कधी एकदाचं शिक्षण पुर्ण करतो आणि नोकरीसाठी अर्ज करतो असे मराठी तरुणांना वाटत असते. दहावी-बारावीच्या मेरीटमधे येणारी मुले हुशार, हजरजबाबी असतात पण त्यांना उद्योगामधे रस नसतो. किर्लोस्कर किंवा बी.जी. शिर्के यांसारखा मोठा उद्योगपती होण्याचे स्वप्न त्यातल कुणी रंगवत नाही. माझ्या मते जोखीम पत्करण्यास मराठी माणूस कचरतो. शिवाय धंद्यासाठी सर्वस्व झोकून देण्याची वृत्ती त्यांच्यापाशी नाही. आपल्या छोट्या छोट्या गावात अजूनही गुजर, मारवाडी समाजाची किराणा मालाची, सोन्या- चांदिची दुकाने दिसतील. आपण गया वया करून त्यांच्याकडून व्याजाने पैसे आणतो. तो आपल्याला लुबाडतो कारण आपण आपला स्वाभिमान गहाण टाकलेला असतो. नको तेथे हा स्वाभिमान उफाळून येतो. आपल्याकडे मुलं मोठी कधी होतात, नोकरीला लागतात आणि लग्न होऊन हुंडा ओढुन आणतात याचीच वाट पाहिली जाते. शिपायाची नोकरी असली तरी हुंड्यासहीत मुलगी मिळते. पण माझ्यासारख्या माणसाला उद्योग करतो म्हणून कोणी मुलगी द्यायला तयार होत नव्हते.

आपण अल्पसंतुष्ट आहोत. थोडक्यात समाधान मानतो. दोन वेळा पोटभर अन्न मिळालं की आपण भरून पावतो. खेडेगावात पुर्वी काही लोकांकडे वीस वीस एकर जमिनी असायच्या. पण मुलाबाळांची संख्या वाढत गेली की शेतीचे छोटे छोटे तुकडे पडू लागतात. शिवाय आर्थिक तणावामुळे पालक मुलांच्या शिक्षणाकडे, वागण्या-बोलण्याकडे लक्ष देऊ शकत नाहीत. मुलांचे आचार-विचार बदलतात. पुढे पुढे ती आई वडिलांना दाद देईनाशी होतात. व्यसनाधीन होतात. पैशासाठी कोणत्याही थराला जाण्याची त्यांची तयारी असते. अशा घरांमधे धंद्याचे व इतर प्रगती, विकासाचे विचार कुठून येणार?

मराठी माणसाचा आणखी एक दुर्गुण म्हणजे पाय ओढण्याची प्रवृत्ती. एखादं कुटुंब बऱ्यापैकी प्रगती करत आहे असे दिसले की भावाभावांमधे किल्मिष निर्माण करणे, मतभेदांना खतपाणी घालणे, भांडण मिटविण्याऐवजी आगीत तेल ओतणे, हे प्रकार सरसास चालतात. चुगल्या होतात. न बोललेली वाक्ये याच्या त्याच्या तोंडी घालून भाऊबंदकी निर्माण केली जाते. बाहेरचा माणूस आपल भलं चिंतितो की नाही याचाही विचार मग घरची माणसे करत नाहीत. अशाने घर दुभंगते. नवीन पिढितील तरुणांनी या सर्व गोष्टींचा विचार करावा. निर्मळपणे परस्पर संबंध टिकवावेत. मदत करताना योग्य व्यक्तीस आपण हात देतो आहोत याची खातरजमा करून घ्यावी.

मराठी माणसाच्या धंद्याच्या स्वप्नांना खरा सुरुंग घरातूनच लागतो याच उत्तम उदाहरण माझ्या अनुभवाला आले. साधारणपणे 1992 सालची ही घटना आहे. आमच्या गावाजवळ जळगाव म्हणून एक गाव आहे. तेथील धुमाळ नांवाचा तरुण माझ्याकडे आला व त्याने उद्योग काढायची इच्छा व्यक्त केली. येतील त्या अडचणिंना तोंड द्यायची तयारी दाखवली. मला तो तरुण बरा वाटला. तो होतकरु आणि बोलण्यात हुशार होता. मी मदत करायचं ठरवलं. त्याप्रमाणे सातारा एम.आय.डी.सी.त जागा घेऊन त्याने पुढील कामाला सुरवात केली. बँकेचे कर्ज मंजुर करण्यात मी मदत केली. सर्व प्रकारे मार्गदर्शन केले. सर्व काम झाली. कारखान्याची ईमारत तयार झाली. पुढील कार्यवाही सुरु होण्याच्या आत त्याचे वडील वारले आणि सर्व कामावर पाणी पडले. कारण वडील वारल्याने सर्व भाऊ विभक्त झाले. त्यावेळी त्यांनी ही ईमारतसुद्धा विकून टाकून पैसे वाटून घेतले. अशा प्रकारे एका उमद्या तरुणाचे उद्योजक होण्याचे स्वप्न धुळीस मिळाले. मला खुप वाईट वाटले. पण दोष कुणाला देणार? या बाबतीत इतरांनी थोडा धीर धरला असता तर थोड्या कालावधीनंतर तो इतरांना त्यांचे पैसे देऊ शकला असता. पण त्याला कोणी समजाऊन घेतले नाही याचे दुःख वाटत. उद्योजक बनण्याचा सुरवातीचा काळ हा नाजूक असतो. तसेच या काळात कोणाच्यातरी आधाराची गरज असते ते त्याच्या बाबतीत घडले नाही.

धंद्याच्या बाबतीत काही गैरसमजुती आहेत. करोडो रुपयांचे व्यवहार काही एकदम होत नसतात. सुरवातीला जो धंदा मिळेल तो समाधानकारक रित्या पूर्ण करण्यासाठी भरपुर कष्ट करण्याची तयारी लागते. कित्येक तास काम कराव लागत. स्वप्नातही सगळे हेच विचार घोळतात इतकी एकरुपता यावी लागते. हे सगळं सोपं मुळीच नसतं. कामात नियोजन, शिस्त, वक्तशीरपणा, हातोटी असणं गरजेच असतं.

आणखी एक गैरसमज असा आहे की जो कुणी धंदा करतो तो लबाड असतो. माझ्या पाठीमागे काहीजण म्हणतात- सगळं लबाडीतून आलेलं आहे. त्यांच्या लक्षात एक गोष्ट येत नाही की नफा मिळविणे म्हणजे लबाडी नव्हे. नफा नसेल तर दिवाळं काढावं लागेल. आम्ही सरकारी नियमांच पालन करून धंदा चालवतो. सरकारच्या तिजोरीत वेळच्या वेळी करांचा भरणा करतो. धंदा आणि नफा या एकाच नाण्याच्या दोन बाजु आहेत.

आपल्या कारखान्यात माल बनवताना दर्जाकडे लक्ष देणे आवश्यक आहे. मालाच्या दर्जाबद्दल सतत जागरुक रहायला हवे. आमचा कारखाना दोन महिने बंद असतानाही दर्जाबद्दल आमचे आधीच नांव झालेले असल्याने आम्हाला पुन्हा काम मिळू लागले. छोटा धंदा असला तरी तपासणी पद्धत अमलात आणली पाहिजे.

उद्योगात नम्रपणा हा गुण फार महत्वाचा. मराठी माणसाचं आणि उडप्याचे हॉटेल एकाच ठिकाणी असेल तर उडप्याचं हॉटेल चालत. त्यांच्याकडे बोलण्याची कला असते, नम्रपणा असतो. असे गुण आपण आत्मसात करावेत.

अलिकडच्या काळामधे बरेच आशादायी वातावरण आहे. तालुक्याच्या ठिकाणांपर्यंत उद्योगाचं वारं गेलं आहे. मराठी माणसाची जडण घडण बदलत चालली आहे. सहकाराचं, बचत गटांचं जाळं वीणलं जात आहे. या सर्व बाबी चित्र बदलण्यास आशादायी आहेत. अनेक सुशिक्षीत तरुणांमधे उद्योग धंद्याचा ओढा दिसून येतो. माझ्याकडे अनेक सुशिक्षीत तरुण येतात. माझ्याबद्दल बरेच प्रश्न त्यांच्या मनात असतात. त्यांना अनेक समस्यांमधुन मार्ग काढायचा असतो. मी दोन तीन तरुणांना माहिती देऊन उद्योग धंद्याकडे वळवले आहे. माझ्या हातातील काम दिले आहे. निव्वळ शेतीवर अवलंबुन न रहाता तरुणांनी जोड धंदा करावा. नोकरीच्या मागे न लागता नवीन क्षेत्रे नीवडली पाहिजेत.

यशस्वी उद्योजक होण्यासाठी कोणत्या गोष्टींची आवश्यकता असते याविषयी काही निरिक्षणे मी नोंदवु इच्छितो. या निरिक्षणांमागे अर्थातच माझा अनुभव आहे.

व्यापार किंवा उद्योगाची प्रवृत्ती बऱ्याच लोकांमधे असते पण ती ओळखून योग्य मार्गदर्शन घेणं आवश्यक आहे. याबाबत तज्ञ मंडळिंची पुस्तके पण मिळतात. एखाद्या यशस्वी उद्योजक किंवा व्यावसायिकाकडून माहिती घेणे फायद्याचे असते. पण आपण स्वतःच स्वतःचे मार्गदर्शक असतो. मीसुद्धा काही करु शकतो या आत्मविश्वासाने आणि अंतःप्रेरणेने प्रयत्न करावेत. अंतर्मुख होऊन विचार करत राहण्याने प्रश्नांवर उपाय सुचत जातात.

नवीन उद्योगाची सुरवात करताना आपण स्वतः काय करु शकतो याचा प्रामुख्याने विचार करावा. स्वतःच्या बुद्धिचा दर्जा प्रामाणिकपणे जाणून घ्यावा. केवळ शैक्षणिक प्रगतीने बौद्धीक दर्जाचे मुल्यमापन होत नाही. वाचन, चिंतन, मनन, निरीक्षण, अवलोकन यांमुळे बौद्धीक दर्जा वाढु शकतो. बुद्धिवान, यशस्वी व्यक्तिंच्या सहवासात राहून त्यांच्या तंत्राचा व पद्धतीचा अभ्यास करत ती आत्मसात करणे हिताचे असते.

आपल्याला सुचलेली कल्पना नवी असल्यास चर्चा करून अंदाज घ्यावा. भितीपोटी मागे राहु नये. कल्पकता, आत्मविश्वास यांच्या जोडीला धाडसीपणा असणं आवश्यक आहे. आपण करु इच्छीत असलेल्या उद्योगाविषयी पूर्वज्ञान मिळवावं म्हणजे अंधारात उडी घ्यावी लागणार नाही.

व्यवसाय निवडताना इतरांनी केल तेच आपण करण्याच टाळाव. रुढ व्यवसायातही नवीन कल्पना शोधुन काढता येतात. लोकांनाही नाविन्याची आवड असते. आपण जो व्यवसाय सुरु करणार आहोत त्या व्यवसायातील वस्तुंची बाजारातील उपयोगिताही बारकाइने लक्षात घेण महत्वाच असत.

कोणत्याही व्यवसायात अनेक समस्यांना समोर जाव लागत. तणाव, भय, चिंता आपल्याला ग्रासून टाकू शकतात. अशामुळे मनःस्थिती बिघडली तर आपण चिडखोर होतो. सुरवातीचा आर्थिक व्यवहार मानवी संबंधांवर अवलंबुन असतो. संतापामुळे संवाद कौशल्य बिघडते. मनःशांती गेली की निर्णय क्षमतेवर परिणाम होतो. चुकीच्या निर्णयाचे परिणाम वाईट होतात. या सर्व समस्यांचा सामना करण्यासाठी मनोधैर्य, प्रेरणाशक्ती वाढवली पाहिजे. अंतःप्रेरणा वाढवली पाहिजे. या आत्मिक ताकदीवरच सामान्य माणसाचा महात्मा होतो. ही ताकदच टाटा, बिर्ला, बजाज यांना उद्योगपती बनवते.

अण्णाचे हे अनुभवाचे बोल आहेत.

## हिंमते मर्दा

## चोवीस

कॉलेजमधे असल्यापासूनच अण्णाला उद्योगपतींचे आकर्षण होते. अनेक उद्योगपतिंच्या चरित्रांचा त्याने बारकाईने अभ्यास केला होता. हे उद्योजक कसे घडले व त्यांनी आपल्या पुढील पिढिला कसे घडवले याचे अण्णाने बारकाईने निरीक्षण केले होते. याच पद्धतीने अण्णाने आपल्या घरातील पुढच्या पिढिला घडवायला सुरवात केली होती. हे अण्णाला कीतपत जमले या विषयी त्याची मुलगी दीपाली हिने लिहिलेले पत्र पुरेसे बोलके आहे.

*तीर्थरुप अण्णांच्या सेवेशी*

*दीपालिचा शि.सा.न.वि.वि.*

*बालगंधर्व रंगमंदिरात 29 जुलै 1996 रोजी माननीय राज्यपाल डॉ. पी. सी. अलेक्झांडर यांच्या हस्ते आपणास पुष्पगुच्छ, शाल, श्रींफळ, प्रशस्तीपत्रक व रोख 5000 रुपये देऊन गौरविण्यात आले. तेव्हा टाळयांचा कडकडाट झाला. बालगंधर्व रंगमंदीर कसं तुडुंब भरलं होत. आपणास उत्कृष्ट लघुउद्योजक म्हणून प्रथम पारितोषिक मिळाले. आंम्हा सर्वांना फार आनंद झाला. वीस वर्षांच्या प्रदीर्घ काळातील अतोनात कष्टांनंतर आपणास त्याचे फळ मिळाले आणि त्या योगे आमचीही मान अभिमानाने उंचावली. आपण 1974 साली एका लहानशा खेडेगावातून येऊन पुण्यासारख्या शहरात लघुउद्योगाची सुरवात केली. पण ही गोष्ट त्या वेळी सर्वांच्या दृष्टीने अगदीच अशक्य होती. पण आपण लोकापवादाची तमा न बाळगता स्थिरावलेल्या उद्योगाच्या क्षेत्रात अनंत स्पर्धा असून प्रवेश केला. जणु काही सापाच्या बिळात हात घातला.*

*आई आम्हाला नेहमी सांगत असते की नवीन उद्योगाच्या काळांत तिला तारेवरची कसरत करावी लागे. घरात पैसा नाही. माझ्या थोरल्या दोन बहिणी, भोसरीचा ओसाड माळ. रोज कोणी ना कोणीतरी येऊन पैशांची मागणी करी. संध्याकाळी खायची भ्रांत. अशा वेळी कोणतीही अंधुकशी आशा नसताना हा उद्योग कसा चालणार असे तिला वाटे. कधी कधी ती एकटीच रडत असे. पण आईचाही तुमच्या कामात हात होता. जे आहे त्यात ती भागवून घेत असे.*

*वीस वर्षांपुर्वी तुम्ही लावलेल्या लहान रोपट्याला आज मोठ्या वृक्षाचं स्वरुप आल आहे. लहानपणापासून माझ्यावर या आपल्या व्यवसायाचा खूप प्रभाव पडला आहे. मी तुमची मुलगी आहे. आज जरी मी 11 वी सायन्सला असले तरी आपल्या वाटेने पुढ जाऊन या उद्योगक्षेत्रात उतरावं अस मनोमन ठरवल आहे.*

*मराठी मनुष्य उद्योगी आहे व तो पुढे आला पाहिजे, या जाणिवेतून आपण निरनिराळ्या लोकांना या उद्योगक्षेत्रात येण्यासाठी मदत केली. त्यांपैकी काही यशस्वी लघुउद्योजक तुमच्याहून सरस झाले. अशी मंडळी आपणास अधुनमधुन भेटायला येतात. बोराटे अण्णा हे आमचे गुरु आहेत असं म्हणणारे लोकही मी पाहिलेले आहेत. काही लोक आशिर्वाद घेण्यासाठी आलेले मी पाहिले आहेत. मला या क्षेत्रात रस आहे व आपलीसुद्धा इच्छा आहे की मी उद्योगक्षेत्रात याव. आत्तापर्यंत आप्पाने (उत्तमने) साथ दिली आहेच व तो पुढेही देईल यांत माझ्या मनात शंका नाही. आपला युवराज अजून दहा वर्षांचा आहे. त्याच्यावर आत्तापासूनच चांगले संस्कार करायला पाहिजेत. तुमच्या वडिलांनी तुम्हाला शिक्षणाची गोडी लावून शिस्तीत वाढवल. तुमच्या आईन घासातला घास चोचीत भरवून मोठं केलं. युवराजभोवती हलाकिची परिस्थिती नाही. पण सभोवारच्या वातावरणात तो बिघडणार नाही हे पाहिले पाहिजे. समाजातलं जे चांगलं आहे ते त्याने घ्यावे. वाईटांना त्याने दूर ठेवावे. उद्योगासाठी झटण्याची वृत्ती निर्माण व्हावी अशी त्याची जडण झाली पाहिजे असं आम्हा तिन्ही बहिणींना वाटतं. मी इंजिनीअर होणार आहे. प्लॅस्टीकपेक्षा वेगळे क्षेत्र मी निवडणार आहे.*

*आपण मला बऱ्याच वेळा बाहेर घेऊन जाता. मोठमोठ्या कंपन्यात निरनिराळ्या स्तरावर कशा प्रकारे काम चालत, त्यांच्या कार्यपद्धती कशा असतात त्याची माहिती आपण मला देता. बँकेचे व्यवहारसुद्धा तेवढेच महत्वाचे असल्याने चलन बनवण्यापासून बिले भरण्यापर्यंत सर्व छोटी छोटी कामे आपण शीकवली आहेत. म्हणूनच पॅकिंगपासून ऑफीस*

*स्वच्छ करण्यापर्यंत सर्व काम मी करु शकते व त्यात मला लाज वाटत नाही. सर्व काम मी आवडीने करते.*

*आपल्या सान्निध्यामुळे हे कळलं की कोणताही उद्योग सुरु करताना निव्वळ पुस्तकी ज्ञान पुरेस नाही. पुर्वानुभव नसताना या क्षेत्रात उतरणं अतीशय धोक्याचं ठरतं. म्हणून ज्यावेळी अभ्यासातून मला वेळ मिळतो त्या त्या वेळी मी मशीन्स चालवते. उत्पादनाच्यावेळी मशिनवर येणाऱ्या अडचणींवर कशा प्रकारे मात केली जाते व चांगल्या प्रतीचं उत्पादन कसं करायचं याचं ज्ञान घेण्याचा प्रयत्न करीत असते. तसंच आपणाकडे दीवसभर निरनिराळ्या प्रकारचे लोक येत असतात, त्यांच्याबरोबर बोलण्याचे तंत्र शिकत असते. कामगार आपलाच असतो, हा विचार आपणापासून आत्मसात केला आहे. कोणताही लघुउद्योग एका माणसावर अवलंबुन नसतो तर मॅनेजर, सुपरवायझर, कामगार यांच्या सहभागाने चालत असतो. अनेकदा कामगारांच्या असहकारापुढे मोठा उद्योगसुद्धा बुडु शकतो.*

*हे सर्व लक्षात घेऊन मी आपल्यापासून खूप काही शिकण्याचा प्रयत्न करत असते. एक यशस्वी महिला उद्योजक म्हणून मला नांव कमवायचे आहे. यासाठी आपले आशिर्वाद माझ्या मस्तकी असतीलच.*

*आपली मुलगी*

*दीपाली*

अर्थातच दीपालीने आपले इंजिनीअर व्हायचे स्वप्न तर पुर्ण केलेच. पण अण्णाबरोबर त्याच्या कारखान्यात काम करायला सुरवात करून उद्योग व्यवसायात येण्याचे आपले स्वप्न पण पुर्ण केले आहे.

# हिंमते मर्दा

## पंचवीस

पुर्वी प्लॅस्टीकच्या धंद्याला फारशी प्रतिष्ठा नव्हती. अण्णाने जेव्हा सुरवात केली तेव्हा प्लॅस्टीक मोल्डींगचा धंदा बाल्यावस्थेत होता. पुर्वी प्लॅस्टीकला कचकडे या हलक्या नांवाने संबोधायचे. सामान्य माणसाला पुर्वी प्लॅस्टीकची खेळणी, प्लॅस्टीकची भांडी व प्लॅस्टीकच्या फुटणाऱ्या बादल्याच ठाऊक होत्या. त्यामुळे प्लॅस्टीकच्या वस्तु या हलक्या दर्जाच्या व टाकाऊ असतात असाच लोकांचा समज होता.

आज प्लॅस्टीक पॉलीमर या नांवाने ओळखले जाते. आज पॉलीमर टेकनॉलॉजिच्या क्षेत्रात मोठी क्रांती झाली आहे. छोट्या वस्तुंपासून ते विमानांपर्यंत पॉलीमरचा वापर वाढत चालला आहे. मोल्डेड प्लॅस्टीकचा वापर तर अनेक ठिकाणी होऊ लागला आहे. आज या क्षेत्रात उद्योग व्यवसाय करण्याची मोठी संधी उपलब्ध झाली आहे.

प्लॅस्टीक धंद्याला महत्व येत चालले आहे. बेअरींगपासून ते जीवनउपयोगी वस्तुंचे उत्पादन या उद्योगात होते. प्लॅस्टीक हे जीवनाचे अंग बनले आहे. त्यात मनाला मोहून टाकणारे कितीतरी रंग बनवता येतात. तसेच कठीण व मऊ अनेक प्रकार असतात. इंजक्शन मोल्डींग, ब्लो मोल्डींग, रोटरी मोल्डींग, कॉम्प्रेस मोल्डींग असे कितीतरी मोल्डींगचे प्रकार आहेत. त्यासाठी निरनिराळया प्रकारचे मोल्ड किंवा डाईज लागतात. मोल्ड बवविणे ही एक कला आहे. त्यासाठी त्या विषयाची गोडी मनापासून असण गरजेच आहे. एक मोल्ड 50 हजार रुपयांपासून 50 लाख रुपयांपर्यंतसुद्धा असू शकतो. निरनिराळया मोल्डींग प्रकारामधे निरनिराळया प्रकारच्या मशीन्स लागतात. याआधी उत्तमचे नांव अनेकदा आले आहे. बी.कॉम. असून इंजिनीअरींगचे ज्ञान नसताना कितीतरी अवघड मोल्डचे डिझाईन तो बनवतो व स्वतःच मोल्ड बनवतो.

अण्णाला वाटते की ग्रामीण तरुणांना धंदेविषयक शिक्षण मिळाले पाहिजे. सध्या शहरी भागात कॉम्प्युटर शिक्षणापासून ते पॉलीमरचे ज्ञान देणाऱ्या उत्तम शिक्षणसंस्था आहेत. अशा प्रकारच्या शिक्षणापासून ग्रामीण तरुण दूर आहे. शहरात जाऊन शिक्षण घेण्याईतकी त्यांची आर्थिक परिस्थिती अजून सुधारली नाही. अशा प्रकारच्या शिक्षण संस्था ग्रामीण भागात पण सुरु व्हाव्यात अशी अण्णाची इच्छा आहे.

लवकरच अण्णाची ही इच्छा पुर्ण होवो!

सव्वीस

अण्णाच्या पुस्तकावर अण्णाला अनेक चांगल्या व उत्साहवर्धक प्रतिक्रिया आलेल्या आहेत. यातील कांही मोजक्याच प्रतिक्रिया खाली देत आहे.

श्री

आदरणीय सौ. रत्नमाला वहिनीसाहेबांच्या समचरणी 8 एप्रील 2011

सा. नमस्कार

आपला खचितच ऋणानुबंध! अन्यथा अचानक आयुष्याच्या एका वळणावर आपली भेट व्हावी व आपण उभयता आमच्या घरी जिव्हाळयाची शिदोरी घेऊनच आलात. जणु माझे भाउ- भावजय आल्याचा भास झाला. तशी आपली मैत्री वर्षानु वर्षाची आहे असा विश्वास निर्माण झाला. आपल्या सहवासाची अवीट गोडी प्रसाद रुपाने सदैव लाभो.

आपण दिलेले ‘मी सदाशीव बोराटे’ हे पुस्तक वाचले. मन गहीवरून आले. आपण किती जगलो याला महत्व नाही. कसे जगलो याचे उत्तम उदाहरण म्हणजे आपली जीवनशैली. अनेक लेखकांची वाचनाद्वारे ओळख आहे. परंतु हे पुस्तक, ही जीवनशैली म्हणजे मुर्तीमंत गंगा आहे. ती सदैव वहात आहे. आजुबाजुचे प्रदेश सुपीक करत त्याचे कधिही तलावात रुपांतर होणार नाही. आपण उभयतांची ही गंगा सदैव मोठी मोठी होत वहात राहो ही श्री चरणी आम्हा सर्वांची प्रार्थना. आप्तस्वकियांचा व मैत्रितील अनेकांची कृतज्ञतापुर्वक जाणीव ठेऊन आपण जीवनक्रम चालु ठेवलात हे अमृततुल्य जीवन होय.

असे अनमोल संस्कार देणाऱ्या श्रीमंत श्रीमती आई वडिलांच्या समचरणी सक्षात दंडवत. आपले श्रेष्ठत्व सदैव द्विगणित होवो या प्रार्थनेसहीत.

आपली

सौ. राजलक्षी र. गवस

आत्मकथनाच्या माध्यमातून परिचीत झालेल्या आदरणीय बोराटे सरांना

काही थोडे जण असतात—

जे स्वकर्तृत्वावर जीवनात यश मिळवतात

कांही थोडेजण असतात

जे आपल्यासह सर्वांचे हीत बघतात

तुम्हिही आहात अशाच काही

काही थोड्या पण अनमोल माणसांपैकी

तुमच्यामुळेच तर

आज हे जग टिकून आहे.

संजीवनी भिडे

26 जानेवारी 2012

## हिंमते मर्दा :

'हिंमते मर्दा- सदाशीव रामा बोराटे उर्फ अण्णा' ही एक चरित्र कादंबरी आहे. ज्याला चरित्र म्हणावं असं जगणं अभावानंच आढळणाऱ्या आजच्या काळात सच्चेपणाने जगलेल्या एका जिद्दी माणसाची ही सत्यकथा आहे. संयम, विवेक, सचोटी, सत्शीलता, सात्वीक वृत्ती, समाजाविषयीची कृतज्ञता, सश्रद्धपणा या इतक्या गुणसंचयासकट जेव्हा एखादं जीवन यशस्विता आणि कर्तबगारीनं झळाळून उठत तेव्हा ती फक्त स्पर्धेत यशस्वी ठरणारी यशोगाथा रहात नाही. असं जीवन ही प्रेरणांची एक गंगोत्री बनुन जाते. वांगना नदीच्या काठी वसलेल्या तडवळे गावचा एक अतीगरीब, वंचीत मुलगा पुण्याला येतो. एम.एस्सी. पर्यंत शिकतो. कारखानदार बनायचे स्वप्न बाळगतो. ते स्वप्न साकार करून दाखवतो हे एक आश्चर्य तर खरेच. पण या आश्चर्यामागे दुर्दम्य जिद्द, चिकाटी, मेहनत यांच अधिष्ठान आहे. उद्योगक्षेत्रात धडाडीने पुढे जात असताना समाजात उद्योगीवृत्तीचा प्रसार करण्याच ध्येय बाळगणाऱ्या आणि सुबत्ता विनम्र वृत्तीने समाजपुरुषाच्या चरणी अर्पण करणाऱ्या एका वांगनापुत्राची ही चरित्र कादंबरी वंचितांना तर प्रेरक ठरेलच पण उद्यमशीलता हे मानवी संस्कृतीचं एक व्यवच्छेदक लक्षण मानणाऱ्या प्रत्येकाला संजीवक व स्फ़ुर्तीदायक वाटेल.

## ई साहित्य प्रतिष्ठान

जिंदगी जिंदादिली का नाम है
मुर्दादिले क्या खाक जिया करते है?

आला दिवस ओझ्यासारखा एकदाचा उरकायचा आणि असेच एकदाचे आयुष्यही उरकून घ्यायचे अशी बहुतांश लोकांची वृत्ती असते. आपल्या हातून काही घडू नये, भले वा बुरे, कोणी आपल्याला नाव ठेवू नये, भले वा बुरे, नवे कसलेच अनुभव घेऊ नये, भले वा बुरे आणि आयुष्यात म्हणता येईल असे काहीच स्वप्न नको, भले वा बुरे असे आयुष्य असंख्य लोक कंठतात. अशा वेळी साहित्य, संगीत, कला, उद्योग, प्रवास, राजकारण, समाजकारण किंवा कोणत्याही नवनिर्मितीच्या स्वप्नाचा ध्यास घेतलेली माणसे नजरेत भरतात. अशा अगदी लहानात लहान माणसाच्या आयुष्याचे चरित्र इतरांना प्रेरक ठरते. सर्वच जण यशस्वी होतात असे नव्हे. पण पानिपतात हरले तरी मराठे लढवय्ये, लढवय्येच ठरले. तसे अयशस्वी ठरलेले जिंदादिल व्यक्ती जिंदादिलच असतात.

आम्ही आमच्या वाचकांना हे आवाहन करतो की ज्या कोणाला आपल्या स्वतःच्या किंवा किंवा आपल्या जवळच्या एखाद्या व्यक्तीच्या आयुष्याचे वेगळेपण जाणवले आणि त्याचे चरित्रकथन लिहावेसे वाटले तर अवश्य लिहा. आम्ही त्याला प्रसिद्धी देऊ. राजकीय, सामाजिक, कला, शिक्षण, उद्योग, अशा कोणत्याही क्षेत्रातील, यशस्वी किंवा धडपड्या व्यक्तींची चरित्रे कायम वाचनीय, स्मरणीय व स्फुर्तीदायकच असतात.

कृपया esahity@gmail.com या पत्त्यावर संपर्क साधा आणि लिखाणाला प्रारंभ करा.



धन्यवाद
आपले नम्र
टीम ई साहित्य